


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

वर्ष २७ वें, अंक ११० ] [ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५४

# ११०

## अनुक्रमणिका



संपादक

विष्णु भिकाजी कोलते

संपादक-मंडळ

के. ना. वाटवे — शं. के. कानेटकर
सरोजिनी बाबर — म. ना. अदवंत

# साभार-स्वीकार

१. राज्यशास्त्राचा विकासः—ले. प्रका. स. मा. गर्गे, ४५९ नारायण, पुणें २. मूल्य ५ रु.

२. भरली ओंजळ :—(कावती) दीपक (डॉ. दि प. टेंबे) प्रका.- रं. न. होनप, अरुणप्रभा, पुणें २. मूल्य १ रुपाया.

३. सावली :— (कविता) सूर्यकांत खांडेकर, प्रका.-मा बा. घोरपडे ९८३, शिवाजी पेठ, कोल्हापूर, मूल्य २ रुपये.

४. सुगंधवारा :— (कविता) प्रताप, प्रका.-गो. ल. जमदाडे, दुधोंडी द.सातारा), मूल्य २ रुपये.

५ लुकलुक (कविता) संपा. —भा. ल. रानडे, सहकार प्रकाशन, सांभारे रस्ता, सांगली मूल्य १॥ रुपाया.

६. सं. महिला मंडळ (नाटक) सौ. मालती जोशी, प्रका. ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगांव, मुंबई, मूल्य १॥ रुपाया.

७ टाकलेली पोर—(नाटिका) दा. वि. जोशी, प्रका. ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगांव, मुंबई, मूल्य १० आणे.

८. चांगुणा (कादंबरी, प्र. के अत्रे, प्रका ग. पां परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगांव-मुंबई, मूल्य ४ रुपये.

९. बिहार-दर्शन-श्यामनंदन प्रका. ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगांव-मुंबई मूल्य १॥ रुपाया.

१० वर्त्तीशी आणि इतर कथा-(कथा) प्र. के. अत्रे, प्रका -ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगांव-मुंबई, मूल्य ३॥ रुपये.

११ कलाकार (नाटक) ले. प्रका.— स.पां. जोशी,समर्थ प्रेस,ठाणें, मूल्य १२ आणे

१२ संदेश (नाटक) ले. प्रका.-स. पां. जोशी, समर्थ प्रेस, ठाणें मूल्य १२ आणे.

१३ मराठीचे अध्यापन —अकोलकर, पाटणकर (तृ. आ.) व्हीनस प्रकाशन, पुणें २, मूल्य ४ रु.

१४जमाखर्चाची द्विनोंद पद्धति (भा. १ पां. शा. कानिटकर, व्हानस प्रकाशन, पुणें २ मूल्य ६ रु.

१५ ज्ञानकोशकार, डॉ केतकर (चरित्र, द. न. गोखले, व्हीनस प्रकाशन, पुणें २, मूल्य १ रु.

१६ आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास भाग १ ला (१८७४ ते १९२०) अ. ना. देशपांडे, प्रकाः-व्हानस प्रकाशन, पुणें, मूल्य १२ रु.

१७ मराठीचे स्वरूपदर्शन (काव्य, व्याकरण,गद्य, गो म. कुलकर्णी, श्री.र भिडे. प्रकाः-मॉडर्न बुकडेपो, पुणें २ मूल्य ३॥ रु.

१८ अलंकार प्रदीप-ग त्र्यं. देशपांडे. पु. गो. निजसुरे प्रका. ठाकूर आणि कं. लि., अमरावती, मूल्य ३॥ रु.

१९ श्रद्धा कीं चिकित्सा—वा. ल. चिपळूणकर व रा. स भागवत प्रका- थिऑसॉफिकल फेडरेशन, पुणें ४ मूल्य ४ आणे.

२० एका सूफीनें आपल्या प्रभूस कसें ओळखिलें ? बिशप जॉन ए. सुभान भाषांतर-सु द. करंदीकर, प्रका. बॉबे ट्रॅक्ट अॅ. बुक सोसा. मुंबई ८, मूल्य १२ आणे.

२१ आजिंठ्याचें लेणें—जीभाऊः-दा. गो. बोरसे. प्रका गिरिजा साहित्य भांडार, मालेगांव, (नाशिक) मूल्य २॥ रु.

२२ राजमुकुट (नाटक शेक्सपिअरकृत मॅकबेथ ; अनु. वि. वा. शिरवाडकर, मराठी प्रकाशन, १२ त्रिभुवन रोड, मुंबई, ४ मूल्य १॥ रु.

२३ ज्ञानेशांची अमृतवाणी—संपा-ह. श्री. शेणोलीकर प्रका-स्कूल अॅंड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, मूल्य ३ रु.

२४ उर्दू लिपी परिचय --ले. प्रका. श्रीपाद जोशी, ४२ नारायण, पुणें २ मूल्य ८ आणे.

२५ उर्दूची नवरत्नें—श्रीपाद जोशी,

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २७ वें, अंक ११० ] [ जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९५४

# ११०

## तव मनिंची पाकोळी पिवळी

धुक्यांत रस्त्यावर थकलेले
दिवे जांभई देती पिवळी
आळसावुनी अंग मोडिते
निळ्या डोंगरीं उंच नारळी.
पहाट अजुनी फुटली नाही
आतुर आरुण गगन-किनारा
अपुऱ्या चुंबनिं विकल स्फुरतो
अधर तुझा जणु सखे, लाजरा !
मधु गंधाचे पाउल वाजे
वाऱ्याच्या मनिं कळी हालतां
तळ्यांत दचके संथ निळें जल
चंदेरी मासळी उसळतां.
अर्धोन्मीलित गुलाब पिवळा
एकाकी घावरा निज दळीं
त्यांत हसे सखि, खिन्न बावरी
तव मनिची पाकोळी पिवळी.
शुक्राच्या चांदण्यांत नाहुन
येशिल सजणे, मला वाटलें
माझ्या डोळ्यांतील जागरण
नक्षत्रांपरि जळत राहिलें !

वा. रा. कान्त

## ये लोकर ओठावर

ये लोकर ओठावर
भरे मनांत हावरें
मृदु कोवळ्या स्वप्नांचीं
निळीं उडालीं पांखरें.
थुई थुई नृत्य त्यांचें
विरें त्यांत तन मन
सविकल्प समाधीची
येई धुंदी एक क्षण.
क्षण नृत्यास भाळली
मम कांक्षा साधी भोळी
पदस्थानीं तयांच्या ती
ठेवी फ़ुलें मिटलेलीं.
कधी कधी वळूनिया
बघे तयां भक्तिभावें
मिटलेलीं अजूनहि
कधी त्यांनी गे फुलावे.
संपे जीवन-पहाट
सये, आरवे कोंबडा
नियतीच्या ओवीने अन्
फुटे मम स्वप्न-घडा

—देवीदास बागूल

अनुक्रमणिका



# कुठे जाईल माझें मन—

कुठे जाईल माझें मन तें मला सांगवत नाही
वाटलें तें लिहिल्याविणें मला कांही राहवत नाही !
कशाला ? कुणासाठी ? पांढऱ्यावर काळें करतों ?
रात्रीचा जागत बसतों, रक्ताचें पाणी करतों !
कांही कागद नासले, असे हेंच माझें समाधान
माझें मन, माझे डोळे, माझें गाणें, माझे कान !
जोंवर हें होत नाही तोंवर मनीं क्षोभ फार
माझ्या मनःशांतीसाठी प्रथम माझा आविष्कार !
घरच्यांचें मरण माझ्या, त्यांना मी सतावतों
नव्या नव्या कविता माझ्या वाचून त्यांना दाखवतों;
जबरीचे ते श्रोते माझे कसें तरी ऐकती
प्रेमामुळे कांहीही तें ' छान छान ' म्हणती;
अर्धें ध्यान, अर्धें मन, अर्धें त्याचें अवधान
तरी त्यांना वाचून दाखविण्यांत माझें पूर्ण समाधान !
दारू पिणें, 'कळपांत' जाणें, पत्ते खेळणें रुचेना
छंद माझा सोवळा असा, कांही केल्या सुटेना !
थोडें आलें प्रकाशांत कोणी म्हणती ' कविवर्य '
अपमानाचे प्रसंगही जगामधे अनिवार्य.
कसली कीर्ति ? कसलें नांव ? जग फार मोठें आहे !
मराठीच्या प्रांगणांत तरी स्थान माझें कोठे आहे ?
' समानधर्मा ' आला पुढें तरी त्याचा ध्यास नाही,
अमर माझें नांव व्हावें याची मला कास नाही.
मी लिहितों माझ्यासाठी याने मला आनंद आहे
कारण काव्यलेखनाचा नित्य मला छंद आहे,
मला कांही ठाऊक नाही विश्व हें विराट आहे
माझें मन गहन खोल नभापरी अफाट आहे;
वाटतें कांही, पटतें कांही, घडतें कांही, नडतें कांही,
दिसतें कांही, हसतें कांही, रडतें कांही, भिडतें कांही,
घोळतें कांही, लोळतें कांही, जाळतें कांही, पोळतें कांही,
राहवत नाही, पाहवत नाही, मोहतें कांही, पोहतें कांही,
घुसळतें कांही, उसळतें कांही, आरपार ढवळतें कांही.
तेंच सारें शब्दांत आणण्यास माझीही दमछाट आहे;
शब्द माझ्या मनासाठी एक अपुरी वाट आहे !
माझ्यासाठी सर्वांसाठी माझ्या कवितेचा थाट आहे,
असा तिचा घाट आहे,
असा तिचा थाट आहे,
एवढ्या मोठ्या मानवतेचा मी एक भाट आहें !

—यादव मुकुंद पाठक

# संध्येचीं पिवळीं मलूल किरणें—

[ सुनीत : शार्दूलविक्रीडित ]

संध्येचीं पिवळीं मलूल किरणें पर्णान्तरीं खेळतीं
वृक्षांचीं हिरवीं शिरें लहरतीं वाऱ्याचिया संगतीं
झालासे दिन म्लान फूल हळवें जावें सुकोनी तसा
वाफारा जमिनींमधून उठतो हा उष्ण निःश्वाससा.
आहे निर्जन माळ दूरवर हा जाऊनिया पोचला
माझे नेतिल पाय तोंवर असें आहेच जाणें मला
एकाकी पथ आक्रमीत पुढतीं मी चाललें सारखी
नेते पाऊलवाट दूर मजला, जी तीच माझी सखी.
शांति स्निग्ध गभीर खिन्न भरली जैं आसमन्तांतुनी
खाली वाकुन पाहिलें क्षणभरी मार्गांत मीं थांबुनी
होती पाउलवाट ती चिमुकली धैर्यें पुढे चालली
दो बाजूंस तिच्या सतेज गवतें पुष्पें वरी सानुलीं
आहे वाढत चालला झरझरा काळोख आता जरी
—कैसें तें न कळे, मुळीं न उरला काळोख या अंतरीं !

—शान्ता ज. शेळके

---

# मनांतला 'मी' !

मनांतला 'मी' नसतो जेव्हा ठिकाणावर,
मला वाटतें—
" परोपकाराच्या क्रुसावरती
घ्यावें स्वतःला ठोकून, लोंबकळत.
सत्त्व-सौजन्याच्या जोडगोळीने ह्या—
उरांत घ्यावें मुर्दे भेदून.
सात्त्विक कृतींची गाथा अशीच
द्यावी फेकून सारी जनाच्या या इंद्रायणींत
स्वतःची जीवन-जानकी द्यावी,
त्यागून, धाडून रानावनांत
सेवेच्या चिपळ्या, भूतदयेचें भस्म लेपून,
परमार्थाची वीणा छेडीत,
मानवतेच्या या मंदिरांत
जावें गुंगून, व्हावें तुकाराम.
लोक-निंदेचे झेलावे हासत प्रहार, आघात
ज्ञानेशासारखे.
ज्ञानेश-तुकोबा
ख्रिस्त-गांधीजी
यांची मिळून मुस करावी,
तयांत स्वतःला घ्यावें मिळवून "
पण—
मनांतला 'मी' होतो जेव्हा जागा,
तेव्हा वाटतें—
' माझ्यापरि भोगी
असावा मीच '

— राजा महाजन

---

## हा मराठीचा संसार ! : ना. सी. फडके

मराठी भाषेच्या सद्य:स्थितीविषयी अभिमानानं बोलावं की निराशेनं तें कधीकधी खरोखर कळत नाही. विष्णुशास्त्रींच्या काळापासून तों आतापर्यंतची मराठी साहित्याची वाढ व प्रगति पाहिली की आपण पुढे गेलों अशी खात्री वाटून संतोष होतो; पण पाऊणशें वर्षांत इतकेच पुढे सरकलों हें मनांत आलं की विषाद वाटल्यावांचून राहत नाही. आपण फार सावकाश वाटचाल करीत आहों, आपली गति फार मंद आहे, आपल्या मार्गांतल्या अडचणी दिसत असूनहि त्या दूर करण्याची शक्ति आपल्यांत नाही, कित्येक बाबतींत आपल्या सामर्थ्याचा, वेळेचा तर निश्चितच अपव्यय आपण करीत आहों, इत्यादि विचार मनांत येतात.

मायभाषेच्या भल्यासाठी मराठी भाषिकांनी जे प्रयत्न करावयाचे ते सुसंघटित असावे या कल्पनेला अनुसरून आपल्या 'महाराष्ट्र-साहित्य परिषदे'ची रचना झाली व कार्यपद्धति ठरली, त्याला जवळजवळ चाळीस वर्षांचा अवधि लोटला. परिषदेतर्फे भरणाऱ्या मुख्य मोठ्या संमेलनाचीं अधिवेशनं नियमानं होऊं लागलीं. प्रांतांच्या, जिल्ह्यांच्या छोट्या संमेलनाची भर त्यांत पडली. मराठी भाषिकांचीं गाऱ्हाणीं, त्यांच्या गरजा, त्यांच्या मागण्या यांना कंठ फुटला. संकल्पांना शब्दांचा आकार येऊं लागला. मराठी भाषिक झोपलेले नाहीत असं जगाला दाखविल्याचं समाधान आम्ही घेऊं लागलों. जुलमी सत्ता उलथून टाकणाऱ्या शिवाजीचे व दिल्लीचं तक्त फोडणाऱ्या भाऊसाहेबाचे आम्ही वंशज आहों अशी भाषा सहज सुचण्यासारखी होती तीहि आम्ही करूं लागलों. परंतु या सर्व गोष्टींचा संकलित परिणाम कितीसा झाला? केवळ साहित्यिक संघटनेच्या जोरावर आम्ही आमचे किती अपमान पुसून टाकले, किती गाऱ्हाणीं संपविलीं, किती लढाया जिंकल्या ? या प्रश्नाचं उत्तर महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या दप्तरांत चटकन् सापडण्यासारखं आहे. छत्तीस संमेलनांचे ठराव दप्तरांत सापडतील. कोणत्या ठरावांची काय फलश्रुति झाली त्याची साक्ष आपल्या मनांत सापडेल !

या ठरावांच्या रूपानं आपण वेळोवेळीं मागितलं काय, आणि जें मागितलं त्यापैकी मिळविलं काय ? आपण संकल्प सोडले किती, व त्यांपैकीं सिद्धीस नेले किती ?—या प्रश्नांच्या अनुरोधानं आपण संमेलनाची, परिषदेची व पर्यायाने भाषेची आणि साहित्याची प्रगति पारखून पाहूं लागलों तर समाधानाला फार थोडी जागा असल्याचं आढळून येईल. संकल्प आणि सिद्धि यांत फार मोठं अंतर राहिलेलं दिसेल. हें अंतर कां राहिलं, कां राहावं, आणि यापुढेहि न राहावं यासाठी काय केलं पाहिजे असे प्रश्न मनांत आल्यावांचून राहाणार नाहीत. त्यांचा विचार आपण करूं लागलों तर जीं कारणं दिसूं लागतील त्यांतल्या तीनच कारणांचा येथे उल्लेख करतों.

एखादा संकल्प मुखावाटे काढल्यानंतर तो कितीहि अडचणी आल्या तरी तडीस नेण्याची जबाबदारी आम्ही ओळखीत नाहीं. संकल्पाचा बोभाटा करण्याची तेवढी आम्हांला हौस आहे. संमेलनाचे असे कित्ती तरी ठराव दप्तरीं दाखल आहेत की त्यांची शाई पुरती वाळली न वाळली तोंच त्यांना पोरकेपणा आला. त्यांना कुणी धनी उरला नाही. संमेलनांत ठराव पसार झाले. त्यांची अंमलबजावणी व्हावी म्हणून कमिट्याहि नेमल्या गेल्या. संमेलनाचं सूप वाजल्याबरोबर कमिटीवरचे लोक ठरावाप्रमाणेच 'पसार' झाले ! मुंबईच्या नभोवाणी केंद्रावर

अनुक्रमणिका

मराठी कार्यक्रमांच्याबाबतींत होणारे अन्याय दूर करण्याबद्दलच्या ठरावाचं एकच उदाहरण सांगितलं तर पुरें होईल. अमुक एका ठरावांत आपली लाज पणाला लागली असं कधीच कुणाला वाटलं नाही.

हें झालं एक कारण. दुसरं कारण असं की आपण सोडलेले कित्येक संकल्पच असे होते की त्यांची सिद्धि साहित्यिकांच्या हातांत नव्हती तर निराळ्या लोकांच्या हातीं होती. संमेलन गाजविण्याच्या दृष्टीनं मात्र असले ठराव फार सोयीचे होते, त्यामुळे संमेलनांत चमचमाट उत्पन्न करण्यासाठीच वावरणाऱ्या धमालवाल्यांना त्यांची हौस वाटणं साहजिक होतं. असल्या ठरावांचं प्राधान्य गेल्या सुमारें बारा वर्षांत इतकं वाढलं की साहित्य संमेलनाचं खरं स्वरूप तरी काय आहे असा मौलिक प्रश्न विचारी लोकांच्या मनांत येऊं लागला. संमेलनाच्या निमित्तानं एकत्र जमलेल्या साहित्यिकांनी कोणत्या संकल्पाचा उच्चार करावा व कोणते वर्ज्य करावे या प्रश्नाची चर्चा सुरू झाली. साहित्याचं आणि साहित्यिकांचं सामर्थ्य ज्या गोष्टी घडवून आणूं शकत नाही त्यांविषयीचे ठराव आपण उगीच केले हें आता उघड झालं आहे.

ठरावांच्या अंमलबजावणीची तळमळ नाही. ज्या क्षेत्रांत आपल्या शक्तीचा कांहीं पाडच नाही त्या क्षेत्रांतल्या गोष्टी घडवून आणण्याचे ठराव करूं नयेत असा विवेक नाही ! मग संकल्प आणि सिद्धि यांत अंतर पडेल नाही तर काय ?

या अंतराचें तिसरें कारण आहे. तें जीं दोन सांगितलीं त्यांहूनहि अधिक महत्त्वाचं आहे. तें हें की महाराष्ट्र साहित्य परिषद किंवा तिचं वार्षिक संमेलन या असाव्या तितक्या प्रातिनिधिक संस्था नाहीत. परिषदेचा किंवा संमेलनाचा आवाज मराठी भाषिकांचा खरा, परंतु तो पूर्णार्थानं ' सर्व ' मराठी भाषिकांचा नव्हे. संमेलनाच्या ठरावामागं अखिल मराठी भाषिक उभे नसतात. अखिल मराठी भाषिकांची शक्ति त्याच्या मागं नसते, 'महाराष्ट्र साहित्य परिषद'च मुळीं अखिल मराठी भाषिकांची असल्याचा दावा सांगतां येत नाही. मराठी भाषिकांची एकंदर संख्या किती ? सुमारें तीन कोटी. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सभासद किती ? जेमतेम दोन हजार. म्हणजे, म. सा. परिषदेचा सभासद हा ' लाखांतला माणूस ' म्हणावयास हवा खरा ! या परिषदेनं मराठी भाषिकांच्या वतीनं काय बोलावं ! आणि परिषदेनं भरविलेल्या संमेलनांत जे संकल्प सुटतील त्यांच्या यशापयशाचा आनंद–विषाद एकंदर महाराष्ट्राच्या अंतःकरणाला कसा वाटावा ?

परिणाम दिसतो तो हा की मराठी भाषेची आणि साहित्याची आजची प्रगति पाऊणशें वर्षांच्या दीर्घ कालाला शोभेशी नाही. प्रसार आणि प्रतिष्ठा या दोन कसोट्यांनी कोणत्याहि भाषेची अभिवृद्धि मोजायची असते. स्थलसंकोचास्तव प्रतिष्ठेचा प्रश्न आपण दूर ठेवूं, आणि फक्त प्रसाराचा विचार करूं. मराठीचे लेखक वाढले, वाचक वाढले, असं आपण म्हणतों. तें खरेंहि आहे. चिपळूणकरांच्या सोडा, हरिभाऊंच्या काळांत किती कादंबरीकार होते, लघुकथालेखक होते, नाटककार, कवि होते ? आणि आज किती आहेत ? संख्या खूपच फुगली आहे. वाचकांची संख्याहि अशीच फुगली आहे. हें पाहिलं की आपली छाती अभिमानानं फुगते. परंतु हा अभिमान दूर ठेवून थोडा विचार करूं या.

मराठींत किती लेखकांचीं किती पुस्तकं प्रतिवर्षीं प्रसिद्ध होतात व तीं किती वाचक वाचतात ? मराठींत किती मासिकं आहेत व त्यांचे किती वाचक आहेत ? साप्ताहिकं किती, दैनिकं किती, व त्यांचे वाचक किती ? या प्रश्नांचीं उत्तरं कागदावर लिहिलीं तर मराठी साहित्याचा एकंदर संसार किती टाचका आणि दैन्याचा आहे त्याचं चित्र आपल्यापुढं उभं

राहील. ज्या मराठी लेखकाचीं पुस्तकं सगळ्यांत जास्ती वाचलीं जातात त्याच्या नव्या पुस्तकाची आवृत्ति दोन हजारांच्या घरांत असते. ही खपायला तीन ते पांच वर्षे लागतात. पुस्तकाची किंमत जास्तींत जास्त पांच रुपये असते. म्हणजे सगळ्यांत लोकप्रिय लेखकाच्या एका पुस्तकाचा पांच वर्षांतला व्यवहार फक्त दहा हजारांचा असतो. या व्यवहाराचा फायदा लेखक, मुद्रक, प्रकाशक, विक्रेते अशा चौघांनी वाटून घ्यावयाचा ! रुपये, आणे, पैच्या गोष्टी सोडून असा प्रश्न करूं की लोकप्रिय लेखकाचं नवं पुस्तक किती लोकांच्या वाचनांत येतं ? पुस्तकाची एक प्रत सुमारें दहा लोकांच्या हातांतून जातें अशी कल्पना केली तर पांच वर्षांत मिळून दहा हजार वाचक होतात. ही झाली सर्वांत लोकप्रिय असलेल्या लेखकाच्या नव्या पुस्तकाची कहाणी. अशा स्थितींत मी सर्वांत लोकप्रिय लेखक आहें अशी प्रौढि त्या लेखकानं मिरवावयाची !

अप्टन सिंक्लेर नांवाचा जो अमेरिकन लेखक आहे त्याचं वर्णन 'The world's most widely read author' असं करतात. त्याच्या एकेका नव्या कादंबरीचा आर्थिक व्यवहार सांगायचा झाला तर लाखाच्या गोष्टी बोलाव्या लागतील. लुई बॉम्फील्ड हा एक तिसऱ्या दर्ज्याचा लेखक. 'Rains Came' ही त्याची एक तिसऱ्या दर्ज्याची कादंबरी व तिचा चित्रपट तयार झाला तोहि तिसऱ्या दर्ज्याचा. परंतु हरिभाऊ आपट्यांपासून तों 'शितू'-वाल्या दांडेकरांपर्यंत चार पिढ्यांच्या साऱ्या मराठी लेखकांची मिळकत एकत्र केली तरी ती बेरीजहि जिच्या जवळपास पोचूं शकणार नाही, येवढी मिळकत बॉम्फील्डला या एका कादंबरीवर व चित्रपटावर झाली ! कांही वर्षांपूर्वी जॉन व्हॅन् डूटेन या एका नवीनच लेखकाच्या 'The Voice of the Tuttle' या नव्या नाटकानं उत्पन्नाचं नि आर्थिक व्यवहाराचं जें रेकॉर्ड केलेलं वाचलं तें अजून मला आठवतं. अवघ्या चार महिन्यांत दीड लक्ष लोकांनी तें नाटक पाहिलं ! पुढच्या खेळांचीं तिकिटं खपलीं होतीं तीं आठ लक्ष रुपयांचीं ! नाटकाचा चित्रपट करण्याच्या हक्काबद्दल डूटेननं किती पैसे मागितले ? तीस लक्ष डॉलर्स. म्हणजे एक कोट रुपये. ज्या आम्हां मराठी भाषिकांना खाडीलकरांना एकेका नाटकाचे मिळालेले पांच हजार रुपये येवढंच रेकॉर्ड माहीत आहे त्यांना हे आंकडे ग्रहगणितांतलेच वाटतील ! आणि मराठीच्या वाढीच्या व प्रगतीच्या गोष्टी आम्ही मोठ्या संतोषानं बोलायच्या !

वर पैशाचा उल्लेख आलेला आहे, त्यामुळे कुणी कदाचित् म्हणेल, साहित्याची अभिवृद्धि पैशानं का मोजायची ? याचं उत्तर असं की, पैसा हें साहित्याच्या अभिवृद्धीचं एकच माप नाही, पण ती घडवून आणण्याची शक्ति फक्त पैशांतच आहे. अप्टन सिंक्लेरच्या कादंबऱ्या लक्षावधि लोक वाचतात याचं कारण त्या उत्तम कादंबऱ्या आहेत हें नसून आंतरराष्ट्रीय घडामोडींच्या व बड्या मुत्सद्यांच्या हजार भानगडी त्यांत वाचायला मिळतात हें आहे. आणि या भानगडींचीं वर्णनं अप्टन सिंक्लेर करूं शकतो याचं कारण तो स्वत: चिकार पैसे बाळगून आहे हें आहे. जगांतल्या सर्व देशांतल्या मुत्सद्यांची आणि त्याची प्रत्यक्ष ओळख आहे. त्यांपैकी कित्येक जणांबरोबर त्याची अनेक वेळां अंगतपंगत झालेली आहे. 'लीग ऑफ नेशन्स'च्या सभांना तो नुसता हजरच राहात नाही तर पडद्याआड चालणाऱ्या गुप्त खलबतांचा भेद तो घेऊं शकतो असे त्याचे स्नेहसंबंध आहेत. आज 'न्यूयॉर्क'ला तर उद्या 'मॉस्को'ला, सकाळीं लंडनमध्ये तर दुपारीं पॅरीसला, आणि रात्रीच्या खान्यासाठी बर्लिनला, अशा प्रकारें जगाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत तो प्रवास करूं शकतो, याचं कारण हें की, श्रीमंतांचे वाभाडे काढणारा असा तो स्वतःच एक श्रीमंत आहे व त्याला पैशाची फिकीर नाही. अप्टन सिंक्लेरजवळ पैसा भरपूर आहे म्हणून त्याच्या अवलोकनाचं आणि अनुभवाचं क्षेत्र

जागतिक होऊं शकतं, आणि तसं झाल्यामुळे त्यांचीं पुस्तकं जगभर वाचलीं जातात, आणि त्यांच्या प्रती दशलक्षांनी काढाव्या लागतात. म्हणजे लेखनाच्या क्षेत्रामध्येहि पैशाकडे पैसा जातो हेंच खरं ! पैशाच्या जोरावर इंग्लंड–अमेरिकेंतले लेखक आपल्या लिहिण्यांत विविधत्व आणूं शकतात व जगांतल्या घडामोडींचं अद्ययावत् प्रत्यक्ष ज्ञान मिळवूं शकतात. मराठी लेखकांचं अनुभवाचं क्षेत्र मर्यादित व आकुंचित असल्याबद्दल टीकाकार त्यांचं व्यंग काढतात, तें खोटं नाही. परंतु तें काढण्यांत काय अर्थ आहे ? मराठी साहित्याच्या संसाराचा टाचकेपणा आणि दारिद्र्य वर सांगितलंच. त्या दरिद्री आणि टाचक्या संसारांत राहणारा एक घटक मराठींतला लेखक जोंपर्यंत आहे तोंपर्यंत 'अरे तुझी दृष्टि वाढव ! तुझ्या प्रतिभेची झेप व्यापक होऊं दे !' असला उपदेश त्याला करण्यांत काय अर्थ आहे ?

मराठी साहित्याची पाहिली गरज कोणती असेल तर दारिद्र्य दूर होण्याची !

भाषेचं दारिद्र्य नाहीसं व्हावयास तिला भरपूर राजाश्रय व भरपूर लोकाश्रय; दोन्ही किंवा दोहोंपैकी निदान कोणता तरी एक आश्रय मिळाला पाहिजे. हे दोन्ही आश्रय मोठ्या प्रमाणांत मिळाले की भाषेचा प्रसार आणि प्रचार कसा आणि किती करतां येतो याचीं उदाहरणं आपल्या डोळ्यांपुढे आहेत. जुन्या आणि नव्या रशियन साहित्यांतील लहानमोठ्या ग्रंथांचीं जगाच्या सर्व भाषांत भाषांतरं करून तीं स्वस्त किंमतींत विकण्याचा उद्योग सोव्हिएट रशियानं केवढ्या प्रचंड प्रमाणावर चालविला आहे हें आपण पाहतों. रशियन साहित्याविषयी जगांतील सर्व देशांच्या लोकांच्या मनांत आदर आणि जिज्ञासा उत्पन्न व्हावी यासाठी मोहरेदार कागदावर उत्तम रीतीनं छापलेल्या लक्षावधि पुस्तिका फुकट वाटण्यांत आलेल्या आपल्याला दिसतात. अमेरिकन साहित्याचाहि अशाच प्रकारचा प्रसार आणि प्रचार चालूं आहे. जगांत आपला गौरव व्हावा असं वाटत असेल तर आपल्या साहित्याचा गौरव करून घेतला पाहिजे असं राष्ट्राराष्ट्रांना वाटूं लागलं आहे. परकीय भाषांतील प्रचाराचे हे लोंढे पाहिले व मराठी भाषेचा प्रचार कितीसा चालला आहे याचा विचार केला की मन विषण्ण होतं. ज्यांचीं जगाच्या सर्व भाषांत भाषांतर होऊन जे जगांतील सर्व देशांपुढे अभिमानानं ठेवतां येतील असे ग्रंथ मराठींत नाहीत काय ? ज्ञानेश्वरी नाही ? संत कवींचं आणि पंडित कवींचं काव्य नाही ? लोकमान्य टिळकांचं गीतारहस्य नाही ? खाडीलकरांचीं नाटकं नाहीत ? कुणाच्या कादंबऱ्या नाहीत ?

हें काम कुणी करायचं ? सरकारनं कां करायचं नाही ? मराठीचा कैवार घेणारं मराठी सरकार कां असूं नये ? आम्ही आता स्वतंत्र झालों ना ? आमच्या देशांतल्या सर्व भाषा स्वतंत्रपणें वाढावयास हव्या ना ? ज्या राज्यांत मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांच्या हिताला अग्रस्थान मिळेल, कारभाराचं दप्तर मराठींत ठेवलं जाईल, न्यायालयांत आणि विधिमंडळांत मराठीचा वापर होईल असं स्वायत्त मराठी राज्य आम्हांला हवं. राजकारणाच्या किंवा अर्थकारणाच्या दृष्टीनं काय बोलायला हवं तें इतर लोक बोलतील. केवळ भाषेच्या आणि साहित्याच्या दृष्टीनं जें बोलायला हवं— आग्रहानं आणि निकरानं बोलायला हवं— तें हेंच की मराठीचा कैवार घेणारं व प्रचार आणि प्रसार करणारं मराठी राज्य आम्हांला पाहिजे. तें अस्तित्वांत आलं की मराठीचं दारिद्र्य संपविणारा राजाश्रय तिला मिळेल.

ही गोष्ट केव्हा व्हायची असेल तेव्हा होवो, तिच्यावर अवलंबून न राहतां मराठीचं दारिद्र्य संपविणारा दुसरा एक उपाय आपल्या हातांत आहे. तो म्हणजे मराठीला लोकाश्रय मिळवून देणं हा होय. आज मराठी भाषिकांची संख्या तीन कोटी आहे. पण या तीन कोटींपैकी

वाचक किती आहेत ? शेकडा एक किंवा फार तर दोन. मराठी साहित्याचा संसार चालला आहे तो येवढ्याच अल्पसंख्य लोकांच्या आश्रयावर. ' लोकसाहित्य ' या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. परंतु सर्वांत महत्त्वाचा अर्थ मी समजतों तो असा की जें ती भाषा बोलणाऱ्या एकूण एक लोकापर्यंत पोचतं व ज्याला त्यांचा आश्रय मिळतो तें लोकसाहित्य. हा अर्थ लक्षांत घेतला तर आजच्या मराठी साहित्याला लोकसाहित्य मुळीच म्हणतां येणार नाही. मराठी लोक आणि मराठी साहित्य यांत भयंकर मोठं अंतर आहे. मराठी भाषिकांपैकी साक्षर किती आहेत ? त्या साक्षरांपैकी पुरेसे शिक्षित किती आहेत ? त्या शिक्षितांपैकी वाचण्याची हौस आणि अभिरुचि असणारे किती आहेत ? या प्रश्नांचीं उत्तरं आपण देऊं लागलों की मराठी लोक आणि मराठी साहित्य यांतील अंतराची आपल्याला कल्पना येईल.

हें अंतर आपण झपाट्यानं तोडलं पाहिजे. एकूण एक मराठी भाषिक साक्षर होतील असं करण्यांत किंचित्‌हि विलंब होऊं देतां कामा नये. हें काम सरकारचं आहे म्हणून स्वस्थ बसतां कामा नये. महाराष्ट्र साहित्य परिषद व तिच्याशीं संलग्न असलेल्या संस्था यांनी हें काम एखाद्या पंचवार्षिक योजनेप्रमाणे अंगावर घेतलं पाहिजे. तीन कोट मराठी भाषिक ' वाचक ' बनले तर मराठीच्या संसाराचं चित्र किती निराळं होईल ? तमाम रोगांवर एकच औषध सांगणाऱ्या माणसाच्या उत्साहानं किंवा भोळेपणानं हें मी लिहीत नाहीं. साक्षरता–प्रसाराबरोबरच इतर अनेक प्रश्न उद्‌भवतील व त्यांचा विचार करावा लागेल हें मला मान्य आहे. या लेखाची मर्यादा सांभाळावयाची आहे म्हणून, नाही तर त्या सर्व गोष्टींचा विचार मीं मांडला असता. परंतु ते सारे विचार करूनहि असंच म्हणायला हवं की तीन कोट मराठी वाचक निर्माण करणं ही आजची पहिली गरज आहे ! म. सा. परिषदेसारख्या साहित्य संस्थांनी करायला हवं असं निकडीचं काम आहे. हें काम ज्या त्वरेनं आपण करूं शकूं त्या त्वरेनं मराठी साहित्याचं आजचं दैन्य संपेल.

---

## दुपार

ग्रीष्माची दुपार टाकते सुस्कारे
रेताड शान्तता शुष्क अन् कोरडे
लिंब वेजार ढाळून चवरी
कढता पानांत कापऱ्या बोचरी
ढळतां दुपार, घरंगळली एकेक
कोरडीं आसवें शुष्कपर्णाभिषेक
प्रदोष प्रहर किलविले पक्षीथवा
झुचमळे स्तब्धता सांधून स्वरदुवा
विहिरीच्या कपारीं दुपार झोपली
गारव्याच्या स्वप्नीं शुष्कता विरली
रात्रींच्या प्रहरीं स्वप्नांच्या झोपेंत
घुमवी बांसरी कृष्ण गोकुळांत

—शि री जोशी

## शीळ

असाच यावा कार्तिकवारा
आमराईतुन घालीत गस्त
आळवीत गाणीं उठवीत लहरी
वातावरणीं मस्त
दंवारलेल्या आंबट ओल्या
अन् रात्रीच्या झोंबत अंगा !
विरळ सावल्या मधून अलगद
उडवित असतां पिवळा पाला;
शरदऋतूच्या अंतःकरणीं
पडुं लागावा रेशीम पीळ
नकळत यावा सुगंध गहिरा
आम्रफुलांचा; आणि शिरावी
आर्द्र अंतरीं किंचित् कातर
हलकी शीळ !

—श्रीकान्त सदावर्ते

अनुक्रमणिका

## मराठी वाङ्मयाचा इतिहास : : माधव गोपाळ देशमुख.

'मराठी वाङ्मयाचा इतिहास' या शब्दत्रयींतून होणाऱ्या अर्थबोधाकडे सूक्ष्मपणें पाहिल्यास या विषयाची व्याप्ति आणि व्यावृत्ति आपोआपच निश्चित होतात. यांपैकी प्रत्येक शब्दाचा उत्तरोत्तर शब्दाशीं महत्त्वाचा अन्वय असून ते सर्व एकमेकांच्या मर्यादा ठरवितात. 'मराठी' या शब्दांत मराठी वाङ्मयाच्या निर्मितीच्या प्रारंभापासून तों आजतागायत त्याचा जो विकास होत आला आहे तो विवक्षित असून त्यांत विभाग वा कालखंड यांचा विचार जसा अपेक्षित आहे त्याचप्रमाणे त्यांतून मराठीतर भारतीय वा जागतिक भाषांचा संबंध व अखिल भारतीय पार्श्वभूमि ही स्वाभाविकपणेंच वगळली गेली आहे. 'इंग्लिश' हा शब्द जसा भाषा (वा वाङ्मय–) वाचक आहे तसा तो इंग्लंडचा अशा देशविशेषण–वाचकहि आहे. म्हणून 'हिस्टरी ऑफ् इंग्लिश् लिटरेचर्' मध्ये बहुधा इंग्लंडमधील वाङ्मयाच्या इतिहासाचा बोध होतो. त्याप्रमाणे मराठी वाङ्मयाचा इतिहास म्हणजे केवळ महाराष्ट्रांतील वाङ्मयाचा इतिहास नव्हे. विदर्भ, मराठवाडा, वस्तर, गोवा इत्यादि अनेक विभाग 'मराठी' या शब्दांत अंतर्भूत होत असले तरी मराठी म्हणजे महाराष्ट्राची असें कांही रूढ वा तत्त्वमूलक समीकरण बनलेलें दिसत नाही. राजकीय दृष्ट्या मराठी भाषिकांचें एकीकरण करूं इच्छिणाऱ्या मुत्सद्यांचें देखील केवळ 'महाराष्ट्र' या शब्दाने समाधान होत नाही. त्यांना 'संयुक्त' असा शब्द आधीं वापरून आपलें मत मांडावें लागतें व हें स्वाभाविक आहे. कारण मराठी भाषिकांपैकी चार–पांच जिल्ह्यांतील लोक दैनंदिन व्यवहारांत व लेखनांत 'महाराष्ट्र' हा शब्द केवळ स्वतःपुरता मर्यादित करीत असतात. हें सिद्ध करण्याला पुरावे देण्याची गरज नाही. ते शतशःच नव्हेत तर सहस्रशः मौजूद आहेत. अशा प्रकारच्या तथाकथित महाराष्ट्राबाहेरील लोकांची भाषा मराठी असली तरी त्यांचीं देशविशिष्ट नांवें 'महाराष्ट्रे'तर आहेत— हें सत्य मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत तरी निदान डोळ्यांआड करण्याचें प्रयोजन नाही. आजवरचे भाषाशास्त्रज्ञ व वाङ्मयसमालोचक हे वैदर्भीय, गोमंतकीय अशा प्रकारची वाङ्मयाची विभागणीहि करून चुकले आहेत! हें त्यांनी राजकीय वेगळेपणामुळे वा त्या त्या लेखकाच्या स्वयंकेंद्रितपणामुळेच केलें असें नव्हे, तर 'महाराष्ट्र' या शब्दाची व्याप्ति 'मराठी' या शब्दाइतकी विस्तृत नसल्यामुळे होय. अर्थात् विचार करावयाचा तो केवळ महाराष्ट्रांतील वाङ्मयाच्या इतिहासाचा नव्हे; तर 'मराठी' वाङ्मयाच्या इतिहासाचा होय.

'वाङ्मयाचा' हा दुसरा शब्द पाहा. त्यांतून मराठी 'भाषे'ची व्यावृत्ति होत आहे. मराठी हें नांव प्रामुख्याने भाषावाचक आहे. मराठी जग, मराठी मन, मराठी बाणा अशा ठिकाणीं त्याला केवळ लक्षणेने स्थलादिवाचक मानावें लागतें. हा इतिहास जसा महाराष्ट्राचा नव्हे तसा मराठी भाषेचाहि नव्हे. मराठी वाङ्मय म्हणजे मराठी भाषेंत निर्माण झालेलें वाङ्मय. केवळ मराठींत भाषांतर केलेलें त्यांतून वगळलें पाहिजे. वाङ्मय या शब्दाचा मूळ अर्थ वाणीनें अन्वित झालेले विचार वा मनोगत असा असला व मामा वरेरकरांसारखे कांही लेखक केवळ भाषणें व व्याख्यानें अशा अलिखित व वाचिक विचारांनाच वाङ्मय म्हणावें असें सुचवीत असले तरी आज केवळ लिखित किंबहुना मुद्रित लेखांना व विशेषेंकरून मुद्रित अशा ग्रंथांनाच वाङ्मय

म्हटलें जातें. त्यांतहि सर्व मुद्रित ग्रंथ म्हणजे वाङ्मय नव्हत ! वाङ्मयांतून प्रथम जर कशाची व्यावृत्ति होत असेल तर ती शास्त्राची. शास्त्र म्हणजे कोणत्याहि विषयाचें जमा झालेलें व व्यवस्थित केलेलें ज्ञान. अर्थात् इंग्रजींतील ' सायन्स ' शब्दाचा शास्त्र हा आज प्रतिशब्द झाला आहे. राजशेखराने आपल्या ' काव्यमीमांसे 'त " इह हि वाङ्मयमुभयथा काव्यं च शास्त्रं च " असें म्हटलें आहे. त्याने काव्य व शास्त्र हे वाङ्मयाचे दोन प्रकार मानले असले तरीं त्याला ' शास्त्र ' या शब्दांतून आजचें विज्ञान वा सायन्स हें अभिप्रेत नव्हतें. काव्य म्हणजे मानवाच्या मनोगताचा प्रतिमारूप वा रसात्मक आविष्कार तद्वत् शास्त्र म्हणजे मानवी विचारांचा युक्तिरूप वा बोधात्मक आविष्कार होय. हे दोन्ही आविष्कार शब्दनिविष्ट असले की वाङ्मय होतात, एवढीच त्याची अपेक्षा होती. आजच्या दृष्टीने मराठी वाङ्मय म्हणजे " मराठी भाषेंतून व्यक्त झालेले, गद्यपद्यात्मक, गंभीर वा ललित विचार-विकारांनी अंकित झालेले, काळ व अभिरुचि यांच्या तडाख्यांतून वांचलेले मुद्रित शब्दप्रबंध " —एवढा व्यापक व एवढाच मर्यादित अर्थ अभिप्रेत समजला पाहिजे. ' शब्दप्रबंध ' म्हटल्या-बरोबर त्यांतून चित्र, शिल्प, संगीत, नृत्य व नाट्य ( म्हणजे नाट्यप्रयोग व रंगभूमि ) हे कलाविषय आपोआपच वगळले जातात.

वाङ्मयांतून शास्त्राप्रमाणे ' साहित्य 'देखील व्यावृत्त होतें. वाङ्मय म्हणजे साहित्य नव्हे. साहित्य हें वाङ्मयाच्या मुळाशीं असलेलें तत्त्व होय. साहित्यतत्त्वाच्या दृष्टीने वाङ्मयाचा विचार करावयाचा म्हणजे वाङ्मयाची विभागणी गद्य व पद्य, गंभीर व ललित, रसप्रधान व बोधप्रधान, किंवा निबंध, चरित्र, समीक्षा, इतिहास, लघुनिबंध, कथा, कादंबरी, नाटक, काव्य अशा पद्धतीने करावी लागेल. अशा पद्धतीने लिहिलेला इतिहास मराठी वाङ्मयाचा इतिहास होणार नाही; तो मराठी साहित्याचा इतिहास होईल. साहित्यप्रकारांना अनुसरून लिहिलेल्या इतिहासांत त्या त्या प्रकाराचें मूळ, विकास व तंत्र यांच्याच दृष्टीने समालोचन करावें लागेल. त्यांत संपूर्ण मराठी वाङ्मयाचें कालक्रमानुसार एकसंध असें विवेचन अपेक्षितां येणार नाही. साहित्य ही वाङ्मयाची ' पद्धति ' होय. तीमुळे वाङ्मयाकडे पाहण्याचा एक दृष्टिकोण मिळतो. पण या दृष्टिकोणांतून मिळालेली माहिती मुख्यतः साहित्याची होय, वाङ्मयाची नव्हे. साहित्यविषयक वा साहित्यशास्त्रविषयक दृष्टि ' वाङ्मया 'चा इतिहास लिहिणाराने सर्वस्वीं बाजूला ठेवली पाहिजे; निदान त्याने वाङ्मयाची विभागणी साहित्यप्रकारानुसार करतां कामा नये. साहित्यालाच वाङ्मयाचें प्रधान अंग मानल्यास आज मराठींत निबंध-वाङ्मयाचीं, काव्य-वाङ्मयाचीं, कादंबरी-वाङ्मयाचीं इत्यादि जीं कांही समालोचनें उपलब्ध झालीं आहेत तीं एकत्र आणलीं की तथाकथित ' मराठी वाङ्मयाचा इतिहास ' तयार होईल !

तिसरा महत्त्वाचा शब्द 'इतिहास' होय. इतिहास म्हणजे इतिवृत्त किंवा इतिवृत्तान्त नव्हे ! अलीकडे इतिहासाचें एक शासन वा शास्त्र निर्माण झालें आहे. त्यांत राजे लोकांच्या नामावळ्या कालखंडांच्या सनावळ्या व घटनांच्या जंत्र्या यांना कमींत कमी महत्त्व उरलें असून आधुनिक पद्धतीचा इतिहास म्हणजे जगाचा, खंडाचा वा एखाद्या राष्ट्राचा, समाजाचा वा संस्थेचा म्हणजे त्यांतील हालचालींचा, घडामोडींचा, मानवी वृत्तींचा, प्रवृत्तींचा, संघर्षांचा व सहकार्याचा एक जिवंत व सचेतन चित्रपट होय. ' इतिहास ' म्हटला की कालखंडांची आवश्यकता आलीच. मानवांची कालगणना दिवस, महिने, वर्षे, दशक, शतक यांच्या परिमाणाने निश्चित केली जाते. ही निश्चिति पृथ्वी व चंद्र यांच्या सूर्यसापेक्ष गतीवर आधारलेली असल्यामुळे बिनचूक असते. एखाद्या राष्ट्राच्या राजकीय इतिहासांत ' कालो वा कारणं राज्ञः राजा वा कालकारणम् ? ' या

प्रश्नाचें उत्तर इतिहासकाराने ' राजा कालस्य कारणम् ! ' असें ठरविल्यास त्या इतिहासाच्या कालखंडांना शतकांचीं-दशकांचीं-वर्षांचीं नांवें देण्याऐवजी तो राजांचीं नांवें देईल. राजकीय इतिहासांत तें इष्ट होईल, कारण एखाद्या भूप्रदेशावर, विशिष्ट कालखंडांत एखादीच व्यक्ति पुष्कळदा एक-छत्री सत्ता चालवूं शकते. त्यामुळे तो सत्ताधारी त्या कालखंडाचा नियामक समजण्यास प्रत्यवाय नसावा. पण वाङ्मयाच्या प्रदेशाला असे नियतिकृत व राजतंत्र नियम लागू पडत नाहीत. ' नियतिकृतनियमरहिता ' व ' अनन्य-परतंत्रा ' अशा विकासशील मानवी कृतीला कालगणनेची ही जड व भौतिक नियमांनी बांधलेली परिगणना कशी स्वीकारतां येईल ?

कोणत्याहि देशांतील वा भाषेंतील वाङ्मयाच्या क्षेत्रांत एका काळीं कोणत्या तरी एकाच व्यक्तीची सत्ता ठळकपणें प्रस्थापित झालेली दिसत नाही. येथे अनेक लहान-थोरांचें मिळून अधिराज्य बनलेलें असतें. अर्थात् साहित्यप्रकारांचें समालोचन हा जसा वाङ्मयाचा इतिहास होऊं शकत नाही, तद्वत् एखाद्या व्यक्तीलाच प्राधान्य देऊन पाडलेल्या कालखंडांचें विवेचन-देखील खराखुरा वाङ्मयाचा इतिहास होऊं शकणार नाही. व्यक्तिप्रधान असे राजकीय इतिहास देखील आता मागे पडूं लागले आहेत. मग ज्या मराठी वाङ्मयाचा इतिहास अद्याप लिहावयाचाच आहे तेथे या गतार्थ पद्धतीकडे कोण वळेल ?

इंग्रजी वाङ्मयाच्या इतिहासाचीं युगें मात्र कांही कांही इतिहासकारांनी केवळ वाङ्मयीनच नव्हे तर तत्तत्कालीन राजकीय व्यक्तिनामांनी शीर्षकांकित केलीं आहेत. पण हा प्रकार प्रारंभींच्या काळांत घडला. तदनंतर इंग्रजींत कांही विशिष्ट कालखंडांतील एखाद्या मूर्धाभिषिक्त अशा वाङ्मयीन व्यक्तीलाच युगपुरुष गणलेलें आहे. पण या दोन्ही प्रवृत्ति सध्या खुद्द इंग्रजींतच जीर्ण झाल्या आहेत. एमिल् लेग्वॉय् व लुई कॅझॅमिआ यांच्या ' ए हिस्टरी ऑफ् इंग्लिश् लिटरेचर् ' या ग्रंथांत व्यक्ति आणि साहित्यप्रकार यांपेक्षा त्या कालखंडांतील वैचारिक प्रवृत्तींना आद्यस्थानीं कल्पून तदनुरोधाने विवेचनाचे टप्पे पाडले आहेत.

' वैचारिक प्रवृत्तींचें विवेचन ' हा वाङ्मयाच्या इतिहासाचा आत्मा मानल्याशिवाय कोणताहि इतिहास परिपूर्ण होणार नाही. इतिहासाची दृष्टि केवळ सनावळी वा नामावळी यांवर केंद्रित व्हावयास नको. तद्वत् तो वाङ्मयीन कृतींची विवेचनरहित कंथा, जंत्री वा शेरेबाजीहि होतां उपयोगी नाही. माहितीहि बिनचूकपणें पडताळून पाहून दिली नाही तर त्याला काय म्हणावें ? मराठी वाङ्मयाच्या इतिहासक्षेत्रांत माहितीच्या दृष्टीनेहि त्रुटित व अप्रमाण असे यत्न कांही कमी झाले नाहीत. त्यांचीं उदाहरणें व त्यामुळे उत्पन्न झालेले घोटाळे, गमती व विनोद यांचें वर्णन देण्याचें हें स्थळ नव्हे. उलटपक्षीं, माहिती कितीहि परिपूर्ण असली व कालानुक्रम कितीहि बिनचूक पाळला गेला तरी ती कृति ' इतिहास ' या संज्ञेस पात्र होणार नाही; हेंहि तितकेंच खरें.

वाङ्मयाचा इतिहास हा एक स्वतंत्र साहित्यप्रकार आहे व त्याचें एक इतर साहित्य-प्रकारांहून वेगळें असें तंत्र निर्माण झालें आहे, ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट. वाङ्मयांतील बोध-प्रधान असे जे चरित्र, आत्मचरित्र, निबंध व वाङ्मयसमीक्षा नांवाचे प्रसिद्ध साहित्यप्रकार आहेत त्यांसारखाच वाङ्मयेतिहास हाहि एक स्वतंत्र प्रकार आहे, हें विसरतां कामा नये. या प्रकारांबाबत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे की, या सर्वांत कर्त्याचें व्यक्तिमत्व जितकें-जितकें समृद्ध व त्याचा त्या त्या वाङ्मयविषयाचा व्यासंग जितकाजितका सखोल व विस्तृत तितकेंतितकें त्याने निर्माण केलेलें वाङ्मय हें भरदार व नांव घेण्याजोगें होईल. या पांचहि साहित्यप्रकारांच्या मर्यादारेषा कांहीकांही उत्कृष्ट वाङ्मयकृतींत देखील इतक्या पुसट झालेल्या

दिसतात की, त्यांची अन्योन्यव्याप्ति ठरविणें जड जावें. परंतु त्या सर्वांच्या मुळाशीं असलेलें सर्वसामान्य तत्त्व शोधावयाचें झालें तर तें ' विवेचन ' या एका शब्दाने सांगतां येईल.

विवेचनाची योग्यता ही जशी विषयाच्या वस्तुनिष्ठ वा परस्मैपदी आकलनावर अवलंबून आहे, तशी ती विवेचकाच्या आत्मनिष्ठ या आत्मनेपदी आविष्कारावरहि अधिष्ठित आहे. एखाद्या शास्त्राइतक्या वस्तुनिष्ठ अलिप्ततेने वाङ्मयेतिहास लिहिला तर ती वाङ्मयकृति ठरणेंहि दुरापास्त होईल. उलटपक्षीं एखाद्या उत्कृष्ट काव्याइतकी आत्मपरता वाङ्मयेतिहासांत आली तर तो पाहतांपाहतां लघुनिबंध बनून जाईल !

बोधप्रधान वाङ्मयाच्या सर्वच शाखांत निर्मात्याचें व्यक्तित्व किती प्रमाणांत प्रतिबिंबित व्हावें याबद्दल कांही नियम घालून देतां आला नाही तरी अभियुक्त ग्रंथकारांच्या कृतींवरून त्याबाबत कांही आडाखे बसविणें कांही कठीण नाही. चरित्रवाङ्मयांत चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाच्या उद्‌घाटनाबरोबर चरित्रलेखकाचेंहि व्यक्तित्व उज्जीवित व अभिव्यक्त होतें. किंबहुना चरित्रनायकाच्या व्यक्तित्वांतील मूलभूत गुणविशेषांना जाब देणारे तत्तुल्य गुणविशेष चरित्रकारांत नसतील तर त्याची कृति उठावदार होऊं शकत नाही, हें लो० टिळकांच्या केळकरकृत प्रसिद्ध चरित्रावरून स्पष्ट होतें. निबंधांत केवळ विषयाचें उद्‌घाटन व विवेचन करून भागत नाही, त्यांत निबंधकाराच्या व्यक्तित्वाचें वाङ्मयाला आवश्यक इतकें प्रतिबिंब पडणारच. तें जास्त झालें व विषय बाजूलाच राहिला तर तो लघुनिबंध होईल. पण त्यांत केवळ विषयाचें वस्तुनिष्ठ प्रतिपादन केलें तर तो माहितीने व चर्चेने भरलेला शालेय निबंध होईल; वाङ्मयकृतीच्या योग्यतेला पोचणार नाही. ' निबंधमाला– ' पूर्वकालीन निबंधसदृश लेखांत हीच उणीव दृष्टीस पडते. वाङ्मयसमीक्षा ही मूळ समीक्षाविषयाइतकीच क्वचित् अधिकतर योग्यतेची वाङ्मयकृति समजली जाते. वाङ्मयसमीक्षेला आवश्यक असलेली साधना, व्युत्पत्ति व सहृदयता समीक्षकाच्या अंगीं नसेल तर तिला केवळ ग्रंथपरिचयाचें व परीक्षणाचें स्वरूप येतें. जी गोष्ट चरित्र, निबंध व समीक्षा यांची तीच वाङ्मयाच्या इतिहासाचीहि होय. अशा इतिहासकाराजवळ काव्यादि सर्जनशील कलाकृतींना आवश्यक असलेली प्रतिभा हवीच असें नव्हे. पण चरित्र–लेखकाजवळ असलेली परकायाप्रवेशाची किमया, निबंधकाराला आवश्यक असलेली विषयाचें उद्‌घाटन करण्याची विवेचनशक्ति व वाङ्मयसमीक्षाकाराची समालोचक दृष्टि या सर्वांचा परिपाक वाङ्मयेतिहासकारांत उतरला पाहिजे. परंतु या तिन्ही प्रकारांहून भिन्न असलेलें त्याचें उद्दिष्ट हें मात्र कोणत्याहि एकाच बाबीवर जोर दिल्यामुळे झाकोळून जातां उपयोगी नाही.

जो केवळ चरित्रकार, केवळ विषयविवेचक वा केवळ रसग्राही समीक्षक आहे अशाने वाङ्मयाचा इतिहास लिहिला तर तो सार्थनाम व परिपूर्ण होत नाही याचीं ठळक उदाहरणें पाहिलीं तर मराठी वाङ्मयाचा इतिहास कसा लिहूं नये, या प्रश्नावर स्वच्छ प्रकाश पडतो. संतकविचरित्रकार ज. र. आजगांवकर यांचीं संतचरित्रें हीं वाङ्मयेतिहासकाराला संदर्भ ग्रंथ म्हणून उपयुक्त होतील; परंतु त्यांना ' इतिहास ' म्हणावें असा खुद्द ग्रंथकाराचाहि दावा नसावा. जवळजवळ त्याच पातळीवरून लिहिलेलीं ल. रा. पांगारकरकृत चरित्रेंहि आहेत. परंतु त्यांशिवाय त्यांनी ' मराठी वाङ्मयाचा इतिहास ' याच नांवानें, तीन प्रचंड खंडांत, ज्ञानेश्वर–नामदेवांचा काल, एकनाथ–तुकारामांचा काल, रामदासांचा काल–असे कालखंड पाडून जो बृहत्प्रयत्न केला आहे त्याचीहि संदर्भ–ग्रंथाखेरीज इतिहास-वाङ्मयकृति या नात्याने कितपत योग्यता मानावी याबद्दल मन साशंक होतें. एक तर मूळ विषयाला अना-

वश्यक असा त्यांतील फार मोठा पाल्हाळ बाजूला सारावा लागतो. उदा० प्रथम खंडांतील वेदविद्येपासून तों 'बुद्धापासून रामदेवराव जाधवापर्यंतच्या अडीच हजार वर्षांचा भरतखंडाचा इतिहास' व शिवाय तामीळांचें साम्राज्य, अळवार संत इत्यादि माहितीचा पूर्वार्ध, उत्तरार्धातील नानातऱ्हेचा रसाळ, पण भोळा पाल्हाळ. म्हणजे मूळ विषयाच्या दृष्टीने 'मिच्या मुठभर व दाढी हातभर' असाच प्रकार प्रथम खंडांत घडला आहे. याच अनुरोधाने दुसऱ्या व तिसऱ्या खंडांतीलहि प्रत्येक प्रकरणाचा प्रास्ताविक भाग सोडला तर मराठी वाङ्मयाचा असा इतिहास कितीसा शिल्लक उरतो ? जो कांही थोडा उरतो तो मात्र मूळ विषयाचें यथायोग्य उद्घाटन करणारा आहे, हेंहि विसरतां येत नाही.

वा. अ. भिडे यांचा 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास' यांतील 'मानभाव-अखेर' पर्यंतच्या भाषेचा विचार सोडून दिला तरी त्याकाळांतील वाङ्मयाच्या वैचारिक वा अंतःप्रवृत्तींचें असें कोणतें विवेचन त्यांत केलें आहे, इकडे लक्ष दिलें की निराशाच पदरीं येते.

वि. ल. भावेकृत 'महाराष्ट्र-सारस्वत' (डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी अद्ययावत् माहितीची पुरवणी जोडलेला) हा ग्रंथ मराठी वाङ्मयाच्या इतिहासविषयक ग्रंथांत नांव घेण्याजोगा असा आहे. प्राचीन मराठी वाङ्याच्या एका भव्य चित्रपटांत लेखकाने आपल्या भरीव संशोधनाचे, चोखंदळ रसिकतेचे, व्यक्तिदर्शनाचे व अनुपमेय शैलीचे बहारदार रंग भरून एक नमुनेदार ग्रंथ निर्माण केला आहे. पण आजच्या अपेक्षेने त्याला, त्या कालखंडापुरता कां होईना, 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' असें नांव यथार्थपणें देतां येईल काय ?— या प्रश्नाचें होकारार्थी उत्तर देणें जडच जातें. मराठींतील संतवाङ्मयाची ओळख करून द्यावयास 'महाराष्ट्रसारस्वता' खेरीज प्रमाणभूत असा ग्रंथ नाही हें मान्य करूनहि 'महाराष्ट्रसारस्वत' कारांची भूमिका तत्त्वविवेचक इतिहासकाराची नाही; ती कवींचें चरित्र व व्यक्तिमत्त्व यांचें उद्घाटन करून तदन्वयें त्यांच्या कृतींचें रसावलोकन करणाऱ्या वाङ्मयसमीक्षकाची आहे हें स्पष्ट केलें पाहिजे. त्यांत कालमान व परिस्थिति यांमुळे वाङ्मयाच्या ध्येयांत, प्रवृत्तींत व आविष्कार पद्धतींत जीं स्थित्यंतरें घडून येतात यांचें इतिहाससापेक्ष असें विवेचन फारच थोडें आहे. वाङ्मयाच्या रसग्रहणावरील व मूल्यमापनावरील त्यांची पकड जशी घट्ट तशी ती इतिहासावर नाही. तथापि वि. ल. भावे यांच्याजवळ इतिहास लिहिणाराला आवश्यक असा भव्य दृष्टिकोण, संतवाङ्मयाबद्दल अभिजात अभिरुचि, संकलनकुशल अशी तत्त्वान्वेषी कुशलता व विषयांशीं तद्रूप होऊन लिहिण्याची सहृदयपूर्ण व कल्पनाशालिनी प्रतिभा होती. या सर्व गुणविशेषांमुळे 'महाराष्ट्रसारस्वता'ने मराठी वाङ्मयाच्या भिंतीवर एक मनोहारि लेणें चढविलें आहे यांत शंका नाही.

वि. ल. भावे यांनी आपल्या अभिजात लेखनकामाठीने मराठी वाङ्मयांपैकी संतसारस्वताचें दालन इतक्या अभिनव रीतीने सजविलें व त्यांत वाङ्मयेतिहासाचींहि कांही बीजें आढळतात याचें कारण त्यांची बैठक वाङ्मयविवेचकाची आहे, त्या त्या ग्रंथकाराच्या वेचक कृतींचें मर्मग्राही अवलोकन करून महत्त्वाच्या भागावर विशेष भर देण्यास आवश्यक असलेला व्यापक दृष्टिकोण व संकलनकुशलता त्यांच्यांत आहे. शिवाय, विशिष्ट कृतींचें वैशिष्ट्य ठळकपणें दाखविण्यास व समुचित भूमिकेवरून रसग्रहण व मूल्यमापन करण्यास अनुकूल अशी कसलेली शैलीहि त्यांच्या ठिकाणीं स्वयंसिद्ध आहे. अशा स्वयंप्रज्ञ व अर्हतासंपन्न लेखकाचें कोणतेंहि लेखन रटाळ होत नाही याचें कारण त्या लेखनामागे असलेली प्रभावशाली व्यक्ति होय; केवळ रसिकता, अभ्यासजडता वा भाषाप्रभुता नव्हे !

प्रत्येक भाषेंत केवळ भाषाशैलीच्या भांडवलावर विषयाचें वाटोळें करून विचारप्रवर्तन-शून्य असें भारूडच्या भारूड निर्माण करणारे कितीतरी ' शैलीकार ' उदयास येतात व वाङ्मयाच्या क्षेत्रांत कोणतीहि भर न घालतां आपल्या लेखनासह अस्तंगत होतात. परंतु महाराष्ट्र-सारस्वतासारखे ग्रंथ वाचकावर कदाचित् वाचतांक्षणींच मोहनी घालीत नसतील. तथापि, ' घृष्टं घृष्टं पुनरपि पुनश्चंदनं चारुगंधि ' या न्यायाने अशा ग्रंथाचें जों जों परिशीलन करावें तों तों त्यांतील विचारांचा व विवेचनशैलीचा सुगंध वाचकांच्या चित्ताकाशांत पिढ्यानुपिढ्या दरवळत राहतो.

' महाराष्ट्र-सारस्वतां 'त वाङ्मयेतिहासाला आवश्यक व विवक्षित असलेल्या सर्व गोष्टी नाहीत. पण ज्या कांही आहेत त्यासाठी मगे एक महान् व्यक्तिमत्व आहे, वैचारिक बैठक आहे व रसाळपणा, कांही तीव्र आवडीनावडी व पूर्वग्रह असूनहि, त्या कालखंडांतील वाङ्मयाच्या वैशिष्ट्यांचा ठसा मनावर उमटविण्याची संस्कारिता आहे. मराठींत ' महाराष्ट्र-सारस्वता ' प्रमाणे वाङ्मयेतिहाससदृश ग्रंथ कांही कमी झाले आहेत, असें नाही. पण तपशिलाबाबत तुलना न करतांहि ' महाराष्ट्र-सारस्वत ' हा एका निराळ्याच पातळीवरचा ग्रंथ आहे हें आवर्जून सिद्ध करण्याची जरूर नाही.

कालदृष्ट्या ' महाराष्ट्र-सारस्वता ' ला पूरक व ' महाराष्ट्र-सारस्वता ' प्रमाणेच सार्थनाम असलेला दुसरा एक मराठी ग्रंथ म्हणजे वि. सी. सरवटे यांचा ' मराठी साहित्य समालोचन ' ( १८१८ ते १९३४ ) हा होय. याचे विभाग साहित्यप्रकारानुरूप पाडले असून त्यांचें समालोचन विविध दृष्टींनी केलें आहे. आयोजन इतिहासाचें नाही; परंतु इतिहासाची दृष्टीहि वगळली नाही. वि. ल. भावे यांची कलात्मकता नसली तरी पांगारकरांचा पाल्हाळहि नाही. वाङ्मयाची निवड व सूचकता नाही; मात्र सर्वस्पर्शित्वाचा प्रयत्न म्हणून समालोचन या नात्याने परिपूर्णता आणली आहे. वाङ्मयसमालोचन असून तें प्रकारानुसार केलेलें आहे म्हणूनच की काय 'साहित्य' समालोचन असें नांव दिलें आहे. इतकेंच काय पण खुद्द ग्रंथकारानेच साहित्य या शब्दाचा केवळ पद्धतीवाचक, ललितवाङ्मयवाचक वा वाङ्मयवाचक अर्थ न करितां— शास्त्रीयवाङ्मय; व्युत्पत्ति, कोश, व्याकरण, अलंकार, रस, भाषा, टीका व लिपि हे ' उपकरण साहित्य ' व नियतकालिकें—एवढा अफाट अर्थ घेऊन विवेचन केलें. आधुनिक कालखंडावरील हा एक प्रमाणभूत समालोचक ग्रंथ आहे व संदर्भग्रंथ म्हणून त्याची योग्यता पांगारकर—भावे यांच्या ग्रंथांहूनहि अधिक आहे.

गं. भा. निरंतर यांचा ' मराठी वाङ्मयाचा परामर्ष ' आणि दा. न. शिखरे यांचा ' मराठीचा परिमल ' हे माहितीच्या दृष्टीने जुजबी, स्थूल व केवळ शालेपयोगी असून खुद्द माहितीच्या बाबतींतहि कांही जागीं अप्रमाण आहेत. तथापि, त्यांचा अपुरेपणा प्रामुख्याने वाङ्मयेतिहासाच्या मूलभूत भूमिकेच्या अभावांतून निर्माण झाला आहे. त्या मानाने वि. पां. दांडेकरकृत ' मराठी साहित्याची रूपरेषा ' ही अधिक रेखीव आहे. तींतहि कालखंडच मुळी साहित्य प्रकारानुसार पाडले आहेत. त्यांतील घेतलेला परामर्ष रूपरेषेच्या स्वरूपाचा आहे, व मराठी साहित्याचें संपूर्ण, सविस्तर, सूक्ष्म विवेचन यांत नाही, अशी कबुली खुद्द लेखकानेच दिली असल्याने ग्रंथाच्या मर्यादा आपोआपच स्पष्ट होतात.

वि. ल. भावे यांच्या तोलाची व्यक्ति वाङ्मयेतिहासाच्या पाठीशीं असल्याखेरीज मराठी वाङ्मयाचा इतिहास सर्वंकष दृष्टींनी परिपूर्ण होणें शक्य नाही एवढाच निष्कर्ष हीं सर्व समालोचनें वाचल्यानंतर काढावा लागतो. परंतु 'महाराष्ट्र-सारस्वत' हें शाहिरी वाङ्मयाशींच थांबलें.

तदनंदर निर्माण झालेलें एका शतकांतील मराठी वाङ्मय समालोचनें सोडलीं तर इतिहासाच्या बाबतींत अद्याप अस्पृष्टच राहिलें आहे असें म्हटलें तरी चालेल. ' अर्वाचीन मराठी साहित्य ' या समालोचनात्मक ग्रंथांत साहित्य-प्रकारानुवर्ती असा वाङ्मयसमीक्षेचा उपक्रम केलेला असून गं. दे. खानोलकरांच्या ' अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक 'तहि दिवंगत ग्रंथकारांच्या वाङ्मयीन चरित्रांच्या द्वारें त्यांच्या कृतींचा परामर्श घेण्यांत आला आहे. हे दोन्ही ग्रंथ अनुक्रमें साहित्य–प्रकार व व्यक्तिचरित्रें अशा प्रकारें विभागलेले असले तरी ते प्रामुख्याने वाङ्मय-समालोचनाचे असून इतिहासाची दृष्टि त्यांत अगदी गौण मानली आहे, हें उघड होतें.

अ. ना. देशपांडे यांनी जाणूनबुजून ' मराठी वाङ्मयाचा इतिहास ' ( १८७४ ते १९२० ) लिहावयास घेतला असूनहि त्यांचें पुस्तक गं. भा. निरंतर, दा. न. शिखरे किंवा वि. पां. दांडेकर यांच्या ग्रंथांहून वाङ्मयकृति या नात्याने कांही वरच्या दर्जाचें आहे असें दिसत नाही. केवळ वाङ्मयसमालोचन या दृष्टीने वाचलें तरी त्यांत कित्येक ठिकाणीं माहितीच्या चुका तर आढळतातच पण त्या त्या वाङ्मयकाराविषयी स्वीकारलेला दृष्टिकोण हाहि सम्यक्दर्शनाच्या ( Perspective ) बाबतींत अपुरा वाटतो. इतिहास–लेखनाच्या बुडाशीं जो एक वाङ्मयसमीक्षात्मक कां होईना, वैचारिकतेचा व वाङ्मयाच्या अंतःप्रवृत्ति आणि ध्येयें विशद करणाऱ्या विवेचकतेचा भक्कम पाया आणि लेखकाचें प्रभावी व्यक्तित्व आवश्यक असतें त्याची साक्ष या संपूर्ण ग्रंथांत थोडी जरी पटली असती तर हा ग्रंथ उल्लेखनीय ठरला असता. इतर समालोचनात्मक ग्रंथांशींहि ज्याची तुलना करितां येत नाही त्याला वाङ्मयेतिहासाच्या नात्याने ' महाराष्ट्र–सारस्वता 'च्या पातळींत बसविण्याचा प्रश्नच उरत नाही.

मराठी वाङ्मयाच्या इतिहासाबावत ही सर्व हालाखीची परिस्थिति लक्ष्यांत घेतां महाराष्ट्र साहित्य परिषदेने असा प्रयत्न करण्याचें योजलेलें पाहून अनेक अपेक्षा निर्माण होतात. वाङ्मयाचा इतिहास लिहिणारास इतिहासविषयाचें सम्यक्दर्शन होण्यासाठी विशिष्ट दूरान्तर ठेवणें आवश्यक आहे. त्याशिवाय निर्लेप असा दृष्टिकोण येणार नाही. इंग्रजी वाङ्मयाचे प्रमाणभूत इतिहास मुख्यतः टेन, जसरांद, लेग्वाय-कॅझामिआ यांसारख्या फ्रेंच लेखकांनी लिहिलेले आढळतात. त्यामुळे इंग्रज लेखकाच्या ठिकाणीं संभाव्य असे स्वाभाविक पूर्वग्रह त्यांच्या कृतींत येऊं शकले नाहीत. खुद्द वि. ल. भावे हेहि एकतर सायन्सचे पदवीधर व त्यांचा व्यवसाय हा मिठाच्या कारखान्याचा. पण त्यांच्या 'महाराष्ट्र-सारस्वतां 'त मात्र कांही आगळेंच लावण्य उमटलें याचेंहि एक कारण ते आपल्या आवडीच्या विषयाकडे अलिप्ततेने पाहूं शकले हें होय. वाङ्मयाचा इतिहास लिहिणाराला इतरांचीं मतें व मतभेद लक्ष्यांत न घेतां वाङ्मयाचें सातत्य व वाङ्मयीन कृतींची कालसापेक्ष पृथगात्मकता यांचा एकसंध आराखडा उभारावा लागतो. अशा प्रकारचें काम आजवर सर्वत्र व मराठींतहि पांगारकर, भावे, सरवटे अशा एकट्या-दुकट्या व्यक्तींनीच तें आपलें जीवितकार्य समजून केलें. ज्यांच्या ठिकाणीं अशीं कामें करण्याचें सामर्थ्य होतें, त्यांना कमीअधिक प्रमाणांत अपेक्षित यशहि मिळालें. परंतु वाङ्मयकृति निर्माण करण्याचें काम सामुदायिक रीतीने, परस्पर सहकार्याच्या तत्त्वावर करून पाहण्याचा एक प्रयोग आज महाराष्ट्र साहित्य परिषदेने आरंभिला आहे. मराठींत ' इतिहास ' या नांवाला शोभणारा असा एकहि प्रयत्न आजवर नांव घेण्याजोगा झालेला नसल्यामुळे या अभिनव प्रयोगाला इतरांनी अपशकून करण्याचें कारण दिसत नाही. वाङ्मयाच्या क्षेत्रांत वि. ल. भावे हे एकदाच उत्पन्न होतात असा कांही सिद्धान्त नाही व त्यांच्या तोलाची दुसरी व्यक्ति पुनः एकटी-दुकटीच अवतरेल असाहि कांही नियम नाही.

वाङ्मयाचा इतिहास कसा लिहावा अथवा तो कसा लिहूं नये यासंबंधीचा दृष्टिकोण निश्चित करून योजनाबद्ध अशा एकाधिक व्यक्तींना एकत्र आणून सामुदायिक रीतीने देखील इतिहासनिर्मिति करणें अशक्य आहे असें नाही. खुद्द इंग्लंडमध्येहि केंब्रिज् आणि ऑक्सफर्ड् विद्यापीठांनी असे सामुदायिकपणें केलेले उपक्रम सुप्रसिद्ध आहेत. अशा उपक्रमांत लेखक म्हणून निवडलेल्या व्यक्तींना आपापले आराखडे परस्पर–विचारविनिमयाने घासून–पुसून एका सूत्रांत गोवण्यासाठी कांही विशेष प्रकारचें सापेक्षपणे धोरण ठेवावें लागेल व सर्वांचें उद्दिष्ट निश्चित व्हावें लागेल. राजकीय, सामाजिक, समाजवादी, जातीय वा सांप्रदायिक दृष्टि त्यांनी दुय्यम ठेवली व त्यांची वाङ्मयीन वैचारिक भूमिका प्रभावी झाली तर एक अभिजात वाङ्मयकृति निर्माण करण्याचें स्वप्न साकार होणें दुर्घट आहे, असें नाही.

आणि यदाकदाचित् होऊं घातलेला 'मराठीचा वाङ्मयाचा इतिहास' सर्व दृष्टींनी परि-पूर्ण होऊं शकला नाही, तरी साहित्याला वाहिलेल्या संस्थेने तें आपलें उद्दिष्टच मानूं नये असें कोण म्हणेल ? नोचार्यो विफलोऽपि दूषणपदं दूष्यस्तु कामो लघुः । हें ध्येयवाक्य समोर ठेवून कार्यान्वित झालेल्या संस्थेकडून त्या विषयावरील अखेरचा शब्द ठरेल अशी एक प्रत्यय-कारक आदर्श वाङ्मयेतिहासकृति निर्माण झाली नाही तरी, विविध दृष्टींनी नटलेली व गेल्या सातशे वर्षांत विकसित झालेल्या मराठी वाङ्मयाचें एक वस्तुनिष्ठ, सुसूत्र व समप्राण समालो-चन देणारी इतिहासकृति निर्माण झाली तर तीहि कांही सामान्य गोष्ट नाही. ' मराठी वाङ्मयाचा इतिहास ' ही एक विकासशील, सर्जनशील व साहित्याला भूषण होणारी वाङ्मयकृति आहे. तिच्या निर्मितीला सामुदायिक प्रयत्नामुळे कांही स्वाभाविक अडथळे आले तरी त्याच कारणाने ती संदर्भ ग्रंथ या नात्याने अधिक भरदार व माहितीच्या बाबतींत अधिकृत होण्याचीहि शक्यता आहे. मराठी वाङ्मयाचा एक भरदार व अधिकृत असा प्रमाणग्रंथ निर्माण झाला तर या अभिनव प्रयोगाबद्दल साशंक असलेले आजचे चिकित्सक देखील असेच उद्गार काढतील की " हेंही नसे थोडकें ! "

---

अनुक्रमणिका

# सात घरची पाहुणी ! : : सरोजिनी बाबर

लोकांच्या घरीं नेहमी नेहमी पाहुणे येतात तसे आमच्या घरींहि यावेत म्हणून आलि-कडे रोज आमच्या घराच्या उंबरठ्यावर वाट बघत मी उभी राहायची. उजाडायच्या आंत अंगणांतल्या बाभळीच्या झाडावर बसलेला किंवा कण्हेरीच्या झाडावरून माणसाची चाहूल लागली की उडून जाणारा कावळा ओरडला म्हणजे मला आनंद व्हायचा. कुणीतरी पाहुणा आता नक्कीच येणार, एरव्ही कावळा ओरडला नसता अशी माझी पक्की समजूत व्हायची. आणि मग मी ' कोण बरं येईल ! ' याची जुळवाजुळव करीत दुपारच्या वेळीं बाभळीच्या झाडावर चढून येणारा पाहुणा सर्वांत अगोदर मला दिसावा या भावनेनं त्याची वाट पाहात राहायची.

शेवटीं एकदाचा तो पाहुणा येणारा दिवस उजाडला. हातांत कसलासा चिठोरा घेऊन मी पेन्सिलीनं कायससं लिहीत बाभळीच्या झाडावर चढून बसलें होतें. आणि एकाएकी दिंडी दरवाजाचं दार करकरलं आणि पाठोपाठ आमच्या आत्याबाईचा आवाज आला. " पांढरं वावर काळं बीं, चतुर म्हणतो पेरीन मी !'...आकलें तें बास आता उतर खाली. हें बग !"

माझ्या हातांत कागद होता आणि मी कांही लिहित होतें हें बघून अशा प्रकारानं मला कोडं घालून लेखक करणारी आत्याबाई समोर दिसतांच मी हातांतील कागद पेन्सिल तिच्या-कडे भिरकावून भरभर खाली उतरलें आणि पळत जाऊन तिला मिठी मारली. कुणी का असेना, आपल्या घरीं पाहुणा आला या कल्पनेनं मला ब्रह्मानंद झाला; आणि मी आत्याबाईच्या कुशींत शिरत म्हणालें, " आता जायचं नाही हं ! मुळींच नाही. हो म्हण ! "

" आधी घरांत तरी चल. पुढचं पुढं." आत्याबाईनं मला कोळशाचं पोतं ओढावं तशी ओढीत नेली. मला तिच्याकडून ' हो ' म्हणून घ्यायचं होतं एवढ्यासाठी अंग सैल टाकून मी तिच्या हाताला धरून अर्धवट लोंबकळत होतें.... तरीपण मीं माझा हेका सोडला नाही. तिला विचारलंच, ' हो म्हणतेस की नाही अगोदर ? ' एवढ्यांत आजी आमच्या आवाजाने बाहेर आली. दार उघडल्यानं तिच्या पाठोपाठ चुलींतला धूरहि बाहेर आला. त्या धुराकडे बघून ' चूल आता पेटविलीस आई ? ' आत्याबाईनं असं विचारीत घुटके गिळीत आजीला वाकून नमस्कार केला आणि त्या दोघीजणी कांही तरी कुजबुजत हंसतमुखानं एकमेकींना भेटल्या. मी आपली आत्याबाईच्या ' हो ' ची वाट बघत एका कोपऱ्यांत उभी होतें.

घटकाभरानं मला जवळ घेऊन माझी समजूत घालीत आत्याबाई म्हणाली, " पाण्याहून पातळ, लिंबाहून कडू, जी माझा हुमाना जिंकल तिला दिन सोन्याचा गडू !... वळीक बगूं !" तिचं असलं बोलणं थोडं फार माहीत होतं तरी मला एकदम कांही उत्तर देतां येईना. माझा 'हो' चा हट्ट बाजूला सारून मी या कोड्याचं उत्तर शोधूं लागलें. पण मला तें सापडेना. धुरामुळं डोळे मात्र लालसर झाले. म्हणून मी आजीवर ओरडलें, "किती ग बाई धूर हा तुझा" तशी त्या दोघीहि हसून म्हणाल्या,' 'वळीकला ग वळीकला !... शानी माजी बाई ती ! आता काशीचा आनल्याला गडू देतें माझ्या शानीबाईला हं ! "

त्या दोघी मायलेकींचं हें बोलणं मला त्या हुमाण्यापेक्षाहि अवघड वाटल्यामुळं मी कावरीबावरी झालें आणि आत्याबाईला बजावलं, "असलं बोलूं नको ! मला समजत नाही."

त्यावर ती खुदखदून हसली , " मग वळकलीस कसं ?"

" कुठं ओळखलं ?"

" धूर म्हनालीस तें ! "

" म्हणजे ? धूर त्याचं उत्तर ? " कोड्याचं उत्तर मला सापडलं या समाधानांत मी एवढी आनंदलें की, आत्याबाईकडून 'हो' म्हणून घ्यायचा मला विसर पडला. तिनं बरोबर आणलेल्या पिशवींतला पितळेचा देखणा गडू बाहेर काढला आणि माझ्या पुढ्यांत ठेवला तरी मला त्या गोष्टीची याद आली नाही. तिच्याजवळ सरकून तिला बिलगत मीं कुतूहलानं विचारलं, " असलं बोलायला तुला कुणी शिकवलं ग ? "

त्यावर आजी म्हणाली, " लाडाची लाडूबाई, आमच्या सात चौकटींत एकली, तिला कोन शिकवीना तें आळशी ! नहान हुती तवा उद्येग काय दुसरा ? इच्यार की ! " त्यामुळं कौतुकानं मायलेकींनी एकमेकींकडे पाहिलं आणि तें खरं असल्याचं मानेनं खुणावीत आत्याबाई मला म्हणाली, " त्या वेळेला आमी गावांतल्या घरांत रहायचे. तिथं सारीं नातीगोतीं. एका वळीनं सात घरं, सात चौकटी. चुलतेमालते एका वळचणीला. मला बगून साऱ्या घरानं म्हणावं की, ' ही सात घरची पावनी. ' आनिक साऱ्या घरांनी माजं कोडकौतुक पुरवावं. बोलतां बोलतां आज्या, मावश्या, चुलत्या हीच भाषा शिकवायच्या मला. उभ्या आळींत मी एकली शाणीबाई ! "

आत्याबाईंचा हा खुलासा ऐकून मी मनांत म्हणालें, ' हिच्याऐवजी मीच असतें तर मजा होती ! ' आणि तिला विचारलं, " शिकवलं म्हणजे एका ठिकाणीं बसून शाळेंत शिकवतात तसं ? की घरांत फिरतां फिरतां उगीचच ? "

" सांग बाई ! सारं सांग. " आजीनं आम्हांला शेवाया रांधाव्यात म्हणून आमच्याकडे पाठ फिरवून सैंपाकघर गाठलं; म्हणून आत्याबाई माझा मुका घेत म्हणाली, " मजी असं हुयाचं बग की, मला शेवाया लई आवडत्यात, तवा खाऊशा वाटल्या की, कुनीबी म्हनायचं आईपुढं जाऊन—' सात समींदराच्या पल्याड रामानं केला भात, आनिक बगावं तर याक याक शीत नऊ नऊ हात ! ' असं म्हटलं की तिनं सारं समजावं ! मलाबी तें बरं वाटायचं. लगालगा जाऊन ' वाढ शेवाया ' म्हनन्यापरास हें बेस असायचं !... "

" अशा सगळ्या गोष्टी जमायच्या रोज ?" आत्याबाईंची युक्ति मला बरी वाटली म्हणून मीं तिच्याकडून खुलासा मागितला.

" सगळं कुठलं जमायला ? आणि रोज कोण बसलंय ऐकायला तरी ? "

" मग ? सवडीनं ? "

" हां ! कधीमधी. समासारखं. "

" म्हणजे ग कसं ? "

" असं बग, आमी पोरी आळींतल्या आळींत खेळत बसलों मजी मला लसूण सोलून दे म्हणायचं असलं की आई म्हणायची ' कोकनांतन आल्या सक्या, त्येंच्या मानत दिल्या बुक्क्या, आन बगावं तर सगळ्या घरभर पसरल्या लिक्क्या !' आणि आमी पन ' थांब हं, आत्ता आलें ' करीत घारीसारकं धावून येऊन लसून सोलीत बसायच्या !...

" चांगलं ! समज आता मला आपल्या आडावर जाऊन पाणी आणायचं झालं तर एकदम कसं म्हणावं ? "

"कां ? त्यांत काय अवगड ? 'आट आटुकली, बारा पिटुकली, जमिनीनं केला जोर आन् बिब्बी नाचीवतीया मोर' असं म्हटलं की, न्हाट, घागर, पानी सारं आपसुक कळतंया !"

" छान आहे हं ! पण मला कसं ग यावं ? "

" काय झालं न याला ? हें बग, न्हानपनीं कुनाकुनाचं असं ऐकलं की, मीं कोन

खायाला आनून बाजारदिशीं नीट दीना झालं मजी दावून म्हनायची ' अत्ताडी म्हैस, तिला फत्ताडी शिंग, खायाला गेलं तरी तिची गोड गोड बोंडं ' 'खोल्यांत खोल्या सात खोल्या, मदल्या खोलींत मोतीदाणा, हुमाना वळकील त्यो चतुरशाना, न्हाईतर येरवड्याचा कैदखाना ' आनिक मग आपसूक केळं आणि डाळिंब माझ्या पुढ्यांत याचं !"

" चांगली की ग हिकमती तूं ! " आत्याबाईच्या डोक्याचं कौतुक करीत माझ्य दरिद्री डोक्यांत हें कसं सुचत नाही म्हणून मनांतल्या मनांत मी रागावलें. इतक्यांत आजीची हाळी आल्यामुळं आम्ही दोघी सैंपाकघरांत जाऊन गरम गरम शेवाया खात बसलों. शेवाया गोड लागत होत्या. पण माझं लक्ष ठिकाणावर नव्हतं. मलाहि असलं बोलतां आलंच पाहिजे या कल्पनेनं भारी उचल खाल्ली होती. त्यामुळं मनाला ताण देऊन कुठंतरी ऐकलेलं ऐनवेळीं गवसतं का मी पाहात होतें ... होतां होतां एक कोडं मला सापडलं आणि मीं तें लगेच आत्याबाईसमोर ठेवलं, " आरदार बैल त्याची मान गरदार, दिल्ली जाईल खरा पण पाण्याला भिऊन उभा राहील "

" हात्तशी ! अग कागूद ! " आत्याबाईनं पट्‌दिशीं माझं बोलणं ओळखलं. मी ओशाळलें. माझी कल्पना तिला हें ओळखणार नाही. कागद पेन्सिलीशीं तिचा संबंध नाही तेव्हा ती हरेल ! पण झालं निराळंच ! मी हिरमुसलेली बघून आजी म्हणाली, " अग, त्यांत काय एवढं थोबाड गप करायला झालं ? दुसरं हुमान घाल ! न्हाई तर मीच घालतें कशी... आणि तिनं आत्याबाईकडे बघून म्हटलं, " सांग हं नीट इच्यार करुन ! हं आलं ध्येनांत. ' धा मानसांत गोष्ट सांगावी खरी, बापाविना पुत्र जन्मला, आई पन नव्हती घरीं !' वळीक बनूं या ? "

हें ऐकून माझं तोंड गोरंमोरं झालंच पण आत्याबाईहि विचारांत पडली, तिला कांही चटकन् उत्तर सापडेना ! त्यामुळं मला बरं वाटलं. मी उगीचच हसलें. तेवढ्यांत आत्याबाईनं तोंड उघडलं, " अग लव ! " त्यामुळं मी ओशाळलें. तिचं चुकावं असं मला वाटलं होतं ! पण माझ्या ह्या वाटण्याकडे दुर्लक्ष करून आत्याबाई म्हणाली, "ह्या लवाची गोष्ट सांगूं का?" मला गोष्टींचा फार सोस. म्हणून " हो हो ! सांग की ! " अशी आनंदानं मान डोलावीत मीं तिच्या गोष्टीकडे कान दिला.

"...तर एक डाव काय गंमत झाली की, सीताबाई माजी वनवासांत असतांना अंकुशाचं बाळुतं घिऊन नदीव धुयाला गेल्याती. अटींग्या वनांत राजाची रानी वनवास भोगत्याली. तिथं काय झालं बग, ती धूत होती हुती त्या जाग्यावच्या झाडावर वान्यारं बसल्यालीं. एका त्यांतल्या मादीच्या अंगाला तिचं प्वार चिकटून पित्यालं. झालं. सीतामाईनं बगितलं आन् जी अंकुशाबाळ रडत असल त्येला घिऊन यावं म्हन तितनं निगाली ती थेट आपल्या झोपडीकड आली...हिकड तंवर काय झाल्यालं की, तितल्या पाळन्यांत रडूनरडून अंकुशानं ह्यो धिंगाना केल्याला. सीतामाईनं त्येला चुटकीसरशी उचलला आन् पदराखाली घिऊन आली की नदीव धुयाला. हें काय तितल्या मानसास्नी कळलं नाही. तितल्या मोठ्या म्हाताऱ्यानं, ऋषी का कोन म्हनत्यात त्येनं, एकाएकीं अंकुशबाळ पाळण्यांत नसल्याला बगून ' सीताबाई आली मजी काय म्हनल ?' या धास्तीनं गडबडीनं नदीकडची लव्हाळ्याची काडी आनली आन् पोरावानी साईनसंगीत फडक्यांत गुंडळून पाळन्यांत घातली. सीताबाई अंकुशाला घिऊन आल्यावर बगीतीया तर पाळन्यांत बाळ रडत्यालं ? आता काय करावं ? पडली दुचति जाऊन बगतीया तर दुसरा अंकुशच !... तवा त्येचं नांव पडलं लव !... समाजलं का ?'

आपल्या कोड्याच्या उत्तराला आत्याबाईनं असं साग्रसंगीत उत्तर दिलेलं बघून आजीला मोठा आनंद झाला. तिनं कौतुकानं लेकीच्या पाठीवरून हात फिरवला आणि मग उठून कसलंसं काम सांगावं म्हणून हातवारे करीत माझ्याकडे बघून म्हटलं, " आंदी गोल गोल ! मंग लाललाल ! आनिक मंग थैय्यम थैय्या ! "

पण मला त्याचा अर्थ विलकूल न लागल्यानं मी चांगलीच वरमलें. तें बघून आत्याबाई एवढी हसली की, मी जास्तच गांगरून गेलें. तिला आणखी चेव आला. तिनं आजीला म्हटलं, " तांवडी गाडी हिरवा दांडा, आंत बसल्या बोडक्या रांडा ! " त्यामुळं तर मी एवढी हादरलें की, त्या दोघींची मला बघून हसतां हसतां मुरकुंडी वळली...

अखेरीस आजीनंच उत्तर दिलं, " अग आकले, पैल्या हुमान्याची वळक मजी ' उकाळ, मुसाळ आन् मिरची ' आनिक दुसऱ्याची ' मिरचीची बी ! ' समाजलं ? हिला चटणी करून आपल्या घरला न्ह्याची असल तवा बोलली आपली ग ! " मग मात्र मला सगळा उलगडा झाला आणि ' आता ग बाई ! ' करीत मीहि हसलें...तेवढ्यांत काय मजा झाली की, आजीनं सैंपाकाची गोष्ट काढीत हातवारे करून मला मोठ्या ठेक्यांत विचारलं, " हां हां मदाणा हां हां चिरली ! ही ही पकाली ! ही ही बिबाणी! .. चालल का ? " त्यामुळं माझं तोंड असं बघण्यालायक झाल की विचारूं नका! आता जास्त झालं तर मी रडेन! रडेन या भीतीनं आजीनं मला पोटाशीं धरली आणि सरळ विचारलं, " अग भोपळा ग - घारी करूं कां म्हटलं तुला..." मग कुठं माझं काळवंडलेलं तोंड उजळलं आणि मला येत होता तो एक हुमाणा मी तिच्यापुढं ध्यानांत घेऊन म्हटलं," आगदाणी, बागदाणी, बागेंत पडल्या चौघीजणी, हिरवं लिंबू कुंकवावाणी !... असं असल तर बग ! " त्यामुळं आजी आणि आत्याबाई दोघीहि कौतुकल्या. त्यांनी माझा मुका घेऊन म्हटलं, " पोरगी नांव काडील ही !" त्यांना माझा अभिमान वाटला. नागवेलीच्या पानांचा विडा मामाकडून मला द्यायचा बेत करून आजीनं मामा शेतावर गेल्याची बातमी देऊन कारण पुढं केलं, " न्हवं इंद्र, न्हवं चंद्र, शाईजाळीचा मासा, येड्यानं घातलं हुमान, श्यान्याला पडला फासा ? ...तवा गेलाय बंदोबस्ताला. "

आणि शेतावर आलेली ' टोळ ' धाड ओळखून आत्याबाईहि काळजीनं म्हणाली, " काय करावं कळत न्हाई बाई ह्या टोळानी मग दादा मागारी कवा यीन म्हणाला ? सांचं ?

" व्हय, जेवायला यील दिवलागनीला. "

" तर मग तंवर बगूंया सैंपाकाचं. " आजीला असं सांगून आत्याबाईनं माझा हात धरला आणि मला घराबाहेर ओढीत म्हणाली, " चल ग पोरी कोलापूरला, भिन देटाचा लिंबू आनायला " मला आधी वाटलं गावाला जायला मिळतंय तर उत्तम. पण माझी भोळी समजूत बघून आजी हसली तसं माझ्या ध्यानांत येऊन मी जीभ चावीत पुटपुटलें, "श्रावणांत ग कशीं अंडीं आणायचीं?"आणि मग जास्त विचारलं आणि आलं नाही तर फजिती नको म्हणून या सात घरच्या पाहुणीला सैंपाकघरांत ढकलून देऊन पुन्हा ती मागंमिगं लागेल या धास्तीनं झाडावर चढून वर जाऊन बसलें !...इतक्यांत आत्याबाईनं बाहेर येऊन मला मोठ्यानं सांगितलं, " देवाला वात लावायची हाय ! तवा ' काळ्या रानांत हत्ती मेला आनिक सगळ्या गांवानं उपसून नेला ! कुठाय ग ? ' तेव्हा मात्र तिला ' कापूस ' पाहिजे असला पाहिजे असा तर्क करीत खाली येऊन देवाच्या देव्हाऱ्यावर टांगलेल्या गाठोड्यांत होता तो कापूस काढून द्यावा या भावनेनं पळतपळत मी घरांत शिरलें.

---

अनुक्रमणिका

# परीक्षणें

उद्यांची संस्कृति ( लेखक— द. के. केळकर. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला किंमत ६ रुपये )

मराठीच्या प्राध्यापकांत श्री. द. के. केळकर ह्यांनी अनन्यसाधारण स्थान कमाविलें आहे. अर्थशास्त्र, इतिहास, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, राज्यशास्त्र, संस्कृत-मराठी वाङ्मय इत्यादि विद्यांचा त्यांचा व्यासंग कोणीहि वाखाणणी करील असाच आहे. अन्य ग्रंथांतील आधार देतांना ते इतके सावध असतात की, अप्रयोजकपणाचा अगर उथळपणाचा आरोप त्यांच्यावर करणें जड जाईल. परग्रंथांतील उल्लेख बिनचूकपणें देणें हा मोठा गुण आहे. तो सर्वत्र आढळत नाही. वाचतां वाचतां ग्रंथकर्त्यावर माझा विश्वास इतका जडला की, मला अज्ञात असलेले निर्देश पडताळून पाहण्याची आवश्यकता मला वाटली नाही. अशा प्रकारचा वाचकाचा विश्वास संपादन करणें हें आस्थेवाइकपणाचा गुण अंगीं असल्याशिवाय साधणार नाही. केळकरांची भाषा आलंकारिक असून सुबोध आहे. नखशिखान्त किंवा आपादमस्तक अवजड दागिन्यांनी मढविलेल्या मारवाडी युवतीप्रमाणे बोजड वाटत नाही. आणि ह्या सर्वो-वर कळस म्हणजे त्यांच्या विचारांत समतोलपणा असल्याने लेखनाला प्रगल्भता लाभली आहे. ही कांटे-काळजी सध्या उंबराच्या फुलाइतकी दुर्मिळ झाली आहे. केळकरांना उलटसुलट प्रमाणें दिसतात; तथापि त्यांचें मत मात्र डळमळीत नसतें.

केळकरांच्या ग्रंथासंबंधाने आणखीहि विशेष सांगण्यासारखें आहे. ते अभ्यासुवृत्तीने व सत्यान्वेषणाच्या दृष्टीने लिहीत आहेत असा ग्रह वाचतांवाचतां वाचकाच्या मनावर होतो. ते द्रव्यार्जनासाठी भाडोत्री काम करीत आहेत असें वाटत नाही. ' आत्मनस्तु बुधैः स्पर्धा-पापधीर्बहुमन्यते ' असा आरोप त्यांच्यावर करितां येणार नाही. स्वतःची नालायकी झाक-ण्यासाठी पूर्वजांच्या काल्पनिक मोठेपणाला ते भाळलेले दिसत नाहीत. त्यांना वेदांत आग-गाड्या, तारायंत्रें आढळलीं नाहीत. तसेंच ते एकाक्ष नाहीत. लंकेंतून येतांना राक्षसांच्या विमानांतून राम आला ह्या ज्ञानाबरोबर रावण सीतेला पळविण्याकरता आला तेव्हा विमा-नांतून आला नव्हता ह्या गोष्टीकडे ते डोळेझाक करीत नाहीत. ह्या कारणाने त्यांच्या लेखांत मिथ्याभिमानाचें प्रदर्शन मांडलेलें दिसणार नाही. आमचे ऋषि त्रिकालज्ञ होते अशी बालिश जल्पना ते करीत नाहीत. अशा निर्विकार बुद्धीने लिहिलेला ग्रंथ मोलाचा असणार हें सांगावयास नको.

केळकरांनी अखेरचें प्रकरण लिहिलें नसतें तर त्यांच्या प्रत्येक शब्दाला, प्रत्येक वाक्याला माझी मान्यता आहे असें मीं निर्धोकपणें म्हटलें असतें.

उद्यांची संस्कृति हें पुस्तकाचें नामकरण ग्रंथसमाप्तीनंतर केलें असावें असा संशय येतो. लघुकथा-लेखकांची ही प्रथा शास्त्रीय ग्रंथांत अनुकरणें अनिष्ट आहे. उद्यांच्या संस्कृतीवर लिहावयाचें आहे हें प्रथमपासून नजरेसमोर असतें तर मांडणी निराळ्या प्रकारची झाली असती असें वाटतें. उद्यांची संस्कृति वर्णावयाची म्हणजे कालची संस्कृति कोणती, आजची कोणती ह्याचा ऊहापोह तर हवाच, पण परवाच्या संस्कृतीचेंहि ओझरतें दर्शन वाचकांना घडावें अशी अपेक्षा

असते. पहिल्या सात प्रकरणांपर्यंत मला संस्कृति हाताला लागेना. सामाजिक ज्या स्थित्यंतरांचें वर्णन ह्या विभागांत केलें गेलें तीं स्थित्यंतरें म्हणजेच संस्कृतीचें व्यक्त स्वरूप होय; ती सुद्धा संस्कृतिच आपण वर्णित आहों ह्याची जाणीव ग्रंथकाराला असल्याचें पुढील प्रकरणीं ध्वनित होऊं लागलें.

संस्कृति भौतिक व वैचारिक अशी दोन प्रकारची असते. त्यांचा एकमेकांवर इष्टानिष्ट परिणाम होत असल्यास किती व कसा होतो ? भौतिक संस्कृति म्हणजेच मानवी बुद्धीच्या विकासाचा इतिहास होय. बैलगाडीपासून विमानापर्यंतचा इतिहास किती भव्य व आश्चर्यकारक आहे हें सांगावयास नको. ऋग्वेदांतील देव रथांतून येत, विमानांतून येत नसत. आता मनुष्यच देवांना विमानांत बसवून खाली आणण्याच्या बेतांत आहे. आमची संस्कृति बैलगाडीशींच थबकली आणि पाश्चात्यांनी मति गुंग करून टाकणाऱ्या भराऱ्या मारल्या. पाश्चात्य आज स्वतःचे पराक्रम अभिमानाने सांगूं शकतात; आम्ही मात्र पूर्वजांच्या लटक्या पराक्रमांच्या मिटक्या मारण्यांत गर्क होऊन गेलों आहों. ह्याचीं कारणें धुंडाळणें अगत्याचें झालें आहे. वैचारिक व भौतिक संस्कृति ह्यांत कार्यकारण भाव आहे की नाही ह्याचाहि विचार करावयास नको काय ? युरप-अमेरिकेंत ह्या दोन संस्कृति समकालीन आहेत किंवा भौतिक प्रथम व नंतर वैचारिक असें घडलें ह्याचा खुलासा ग्रंथकारांनी केलेला दिसत नाही. ह्याचें कारण विषयाची मांडणी त्यांनी निराळ्या दिशेने केली हें असावें.

उद्यांची संस्कृति म्हणजे समता असें मोघम सांगून भागण्यासारखें नाही. समतेचें विवरण करावयास पाहिजे होतें. मानवकृत असमानता नष्ट करितां येईल. परंतु ही मनोराज्यांतील कल्पना—रम्य समानता प्रस्थापित करणें अवघड आहे. सध्या आर्थिक समता नूतनांच्या डोक्यांत घोळत आहे. क्षणभर कल्पना करूं की, एक जादा बादशाही फरमान काढून सरकारने प्रजेची सर्व संपत्ति जप्त करून ती सर्वांस सारखी वाटून टाकिली. असें केल्याने सर्वांस समाधान होईल अशी खातरजमा कोणी करूं शकेल काय ? अशाने ' सर्वे सुखिनो भूताः ' असे समाधानाचे उद्गार सर्वांच्या तोंडून निघतील असा विश्वास वाटतो काय ? पैसा बुद्धींतून उगम पावतो. तेव्हा सर्वांची सारखी बुद्धि करावी लागेल. हें इष्ट आहे म्हटलें तरी साध्य कसें होणार.

निरनिराळ्या देशांत समतेच्या कल्पना सारख्याच आढळणार नाहीत. फ्रान्समध्ये उमरावां-विरुद्ध लोक उठले व त्यांनी समतेची घोषणा केली. आपल्याकडे ब्रिटिश सरकारच्या चिथावणीने व धार्मिक कल्पनांचा ऱ्हास झाल्याने ब्राह्मण-ब्राह्मणेतर-वाद चेतावला. मार्क्सवाद्यांनी कारखानदारांवर आग पाखडली. समाजाच्या तराजूने तोल सोडला. एक बाजू सुजेप्रमाणे फाजील फुगली की, समाजांत असंतोष उत्पन्न होतो. असंतोष, समाजाचें हें दुखणें चव्हाट्यावर मांडतो. शेतकीयुगांत जमीनदारांचें दुखणें समाजाला जडलें; विद्यमानकालीं उद्योगपतींचें जडलें आहे. विचार करण्यासारखी गोष्ट ही की, हें दुखणें वास्तविक असेल किंवा काल्पनिक असेल. आज आम्ही दोरीलाच साप समजून झोडपीत आहों. भारतांत उद्योगधंद्यांचा श्रीगणेशायनमःसुद्धा नाही तोंच आम्ही उद्योगपतींवर शस्त्र उपशीत आहों. ही केवळ पोपटपंची होय. विद्यादेखील स्वदेशी हवी म्हणतात ती अशी. आपल्या देशाच्या परिस्थितीचा अभ्यास न करतां वेगळ्या परिस्थितींत जन्म पावलेलें तत्त्वज्ञान येथे लागूं करूं पाहणें वेडेपणा आहे. त्याने विनाशकाल मात्र समीप येईल.

भारतांत ऐंशी लोक शंभरांत निरक्षर आहेत; सरकारी पैसा खाणें हें पाप समजले जात नाही; सरकारी काम म्हणजे आपलेंच काम ही कल्पना उदय पावली नाही; तेथे सर्व

उद्योगधंदे सरकारने आपल्या हातीं घ्यावे असें आग्रहाने प्रतिपादणारे आकाशांत वावरतात ह्यांत संशय नाही.

नवीन समाज आपण निर्माण करूं असें कित्येकांना वाटतें; परंतु हा भ्रम आहे. आपल्या मनाप्रमाणे समाज बनवूं ही भाषा पोरच बोलूं शकतील. वृक्षाप्रमाणे समाज वाढत असतो; आणि ती वाढ देखील नियमानुसार होते. दुसरा एक भ्रम हा की, एकदा का समाज नीटनेटका बनविला की तो तसाच सतत टिकेल. कलियुग हें सत्ययुगांतूनच निघालें हें त्यांच्या लक्षांत येत नाही. कोणतीहि घटना गुणदोषान्वित असते. म्हणून गुणांबरोबर दोष पतकरावे लागतात. हे दोष बीजरुपाने असतात. त्यांचा विपाक न होऊं देणें ह्याविषयी नेत्यांनी जागृत असणें अवश्य आहे. समाज नेहमी उन्नतीच्या मार्गावर असतो. शेतीपूर्वकालीन भटका समाज शेतीयुगांतील स्थायी समाज व यंत्रयुगांतील धावता समाज असे आपण कप्पे पाडले तर जग प्रगतीच्या मार्गावर आहे ही गोष्ट एकदम डोळ्यांत भरते. ह्या सुधारणेबरोबर अनान्वित प्रकार घडतात हें खरें. तथापि ही विकृति असून प्रगति ही प्रकृति आहे ह्यांत शंका बाळगण्याचें कारण नाही. शेतीला गुलाम ऊर्फ जन्मभर नोकर हा उपकारक होता. हा गुलामांचा वर्ग अस्तित्वांत आला नसता तर शेतीचा फैलाव कितपत झाला असता ह्याचाहि विचार झाला पाहिजे. स्त्रीची परवशता ही तत्कालीन परिस्थितीला अनुरूप होती. त्यांना क्रौर्याने वागवणें हें विचलन होय. हें अज्ञानाचें व वैचारिक दारिद्र्याचें कार्य समजलें पाहिजे. तेव्हा संस्कृतीचा अभाव होता असें निश्चयपूर्वक म्हणतां येणार नाही. समाज सुधारावयाचा म्हणजे वेळोवेळीं ज्या गोष्टी प्रगतीला अडथळा करणाऱ्या ठरतील त्यांचें उन्मूलन करावयाचें. एवढा विस्तार करण्याचें कारण उद्यांच्या संस्कृतीचें विवरण करितांना ज्या गोष्टी अपरिहार्य आहेत त्यांचा मागमूसहि ह्या ग्रंथांत मला लागला नाही.

मनुष्यकृत असमतेचा नायनाट करण्यासाठी भारत सरकारने प्रशंसनीय गोष्टी केल्या आहेत. पदव्यांची वार्षिक खैरात बंद झाली; अस्पृश्यता बेकायेशीर ठरवून जातिभेदाच्या कोटाला सुरुंग लावला; प्रत्येक सज्ञान इसमाला मताधिकार देऊन राजकीय दृष्ट्या सर्वांना समान पातळीवर आणून बसाविलें; राज्यकारभारांत धर्मभेदाचें मूळ उखडून टाकिलें; जमीनदारी नष्ट करून जमिनी कुळांस वाटल्या; नफ्यावर व व्याजावर नियंत्रण घातलें; स्त्रियांना पुरुषांच्या पंक्तींत बसविलें. अशा रीतीने असमानता दूर केली. परंतु हीं पाउलें समतेच्या बाजूने टाकिलीं असें म्हणणें तार्किक दृष्ट्या युक्त होणार नाही. असमता काढून टाकणें म्हणजे समता स्थापित करणें नव्हे. कोणत्याहि माणसाला त्याच्या धर्मामुळे, जातीमुळे अगर जन्मामुळे त्याच्यांत मर्दुमकी असेल तर राज्यांत कोठेहि मज्जाव होणार नाही इतकी मजल आपण मारली आहे. आम्ही समता स्थापन करूं अशी घोषणा सरकारने केलेली नाही. प्रत्येकाच्या कर्तृत्वाला योग्य संधी मिळेल अशी परिस्थिति निर्माण करणें हें सरकारचें आद्य कर्तव्य. ग्रंथकारांनी असमता घालविणें व समता आणणें ह्यांतील भेद लक्षांत घेतला नाही असा संशय येतो.

खासगी मालकी हक्क संपुष्टांत आणून जमीन, व्यापार, उद्योगधंदे सरकारने आपल्या हातीं घेतले तर त्याचे परिणाम काय होतील ह्याची चर्चा करणें उद्यांच्या संस्कृतींत आवश्यक होतें. काम देऊन लोकांना पोसणें हें सरकारचें स्वरूप राहील; लोकांची जबाबदारी कमी होऊन सरकारची वाढेल. कोणत्याहि कारणाने काम करण्यास जे असमर्थ असतील त्यांचा प्रतिपाल करणें सरकारास भाग पडेल. अशा स्थितींत लोकांचा स्वभाव पालटण्याचा संभव आहे की नाही ह्याचाहि विचार करावयास नको काय? सामान्य जनतेपुढे ध्येय किंवा उद्दिष्ट

कोणतें असणार व तें ध्येय लोकांना कार्यप्रवण करण्यास त्यांच्या कर्तृत्वशक्तीला चेव आणण्यास, त्यांच्या बुद्धीचा विकास होण्यास पुरेसें प्रोत्साहक असेल काय ह्याचा संपूर्णपणें विचार करणें अवश्य होते. असें असून ह्याचें दिग्दर्शनहि प्रस्तुत पुस्तकांत आवणांस होणार नाही. ह्या घटनेंतहि दोष असणार. ते कालांतराने फोफावतात व मग ती स्थिति आपणांस जाचक होते. ती बदला म्हणून आक्रोश सुरू होतो. ह्याहून परिस्थिति पालटल्याने चालू घटना निरर्थक होते हा प्रकार वेगळा. तात्पर्य, समाजाची उलथापालथ सारखी चालू असते. परिस्थितीला अनुरूप वागणें हेंच आपलें कर्तव्य. गेलें तें निंद्य व भावी तें वंद्य असा समज करून घेणें गैर आहे. आताच पाहा. लोककल्याणकारी आमचें राज्य आहे म्हणून प्रत्येक सरकार जाहीर करीत आहे. तथापि युद्धाची भीति कायम आहे. ह्यास्तव युद्धसामुग्रीवर कोट्यवधि रुपये खर्च करावे लागणार. अशा स्थितींत लोककल्याणार्थ पुरेसा पैसा कोठून आणणार ? ह्याकरता शांततेचा प्रचार केला जात आहे. पण जुन्या जमान्यांत रुळलेल्या व द्रव्याची अडचण न भासणाऱ्या आजच्या अमेरिकेला शांततेचा उपदेश मानवत नाही. अशा प्रकाराचीं घर्षणें सदैव बदलत राहणाऱ्या समाजाला अनुभवावीं लागलीं तर त्यांत आश्चर्य तें काय ? समाज हा घड्याळाच्या लंबकाप्रमाणे सतत हेलकावे खात असतो.

आमच्या तत्त्वज्ञानाच्या मोहक प्रवाहांत आम्ही इतके वाहून गेलों की ऐहिक कर्तव्याला आम्ही पार विसरलों. पारलौकिकाच्या निसरड्या मार्गामागे लागून धड ऐहिक नाही व पारलौकिक नाही अशी त्रिशंकूसारखी आमची गत झाली. जो उठला तो संसार गलिच्छ ठरवून त्याची निर्भर्त्सना करूं लागला. विरक्तीवांचून आत्मसाक्षात्काराचा आनंद लुटणें दुर्लभ, अशा स्थितींत 'इदं च नास्ति परं च नास्ति' असा नेभळटपणाचा घुटका घेत कालक्रमणा करावी लागली तर नवल नाही. संतांच्या शिकवणीने आमचें अकल्याणच अधिक झालें आहे. अनाधिकारी माणसाला न झेपणाऱ्या गोष्टी सांगितल्याने त्याचें नुकसानच होणार हें निर्विवाद होय.

संस्कृति–संगमावर अभिप्राय देतांना त्या पुस्तकांत संस्कृति नाही, व संगम नाही; बाकी पुष्कळ आहे व तें सर्व मननीय आहे असें मीं म्हटलें होतें. ह्याहि खेपेस माझ्यावर तसेंच कांही म्हणण्याची पाळी आली आहे. उद्यांची संस्कृति हा अत्यंत आकर्षक व महत्त्वाचा विषय आहे; परंतु त्यालाच ग्रंथकारांनी गचांडी दिलेली दिसते.

— ना. गो. चापेकर

**ज्ञानेश्वरीची भाषा**

[Linguistic Peculiarities of Jnanesvari (Deccan College Dissertation Series No. 13.) लेखक–मुरलीधर गजानन पानसे, पुणें १९५३. पृ. १३+६५५, किंमत २० रु.]

मराठीचें भाषाशास्त्रविषयक साहित्य संख्येने भरीव वाटतें, पण खऱ्या अभ्यासकांना उपयोगी पडणारें लेखन वेगळें काढूं म्हटलें तर तें फारसें होणार नाही. मराठीवरील आपल्या प्रबंधाने ब्लॉक यांनी अतिशय उपयुक्त असें एक साधन निर्माण करून ठेवलें आणि त्याचा उपयोग पूर्वीच केला गेला असता तर मराठीचें भाषाशास्त्र फार प्रगति करूं शकलें असतें. मूळ प्रबंधाची भाषा बहुसंख्य विद्वानांना अगम्य असली तरी गेलीं तेरा वर्षे त्याचें मराठी

भाषांतर लोकांसमोर आहे. परंतु त्यांतील शास्त्रीय विवेचनाचा आणि संशोधनाचा योग्य उपयोग फारसा कोणी करून घेतलेला नाही. तसेंच भाषाशास्त्राचें तात्त्विक ज्ञान असल्याशिवाय या विषयावर संशोधन करण्याची परंपरा या देशांत रूढ झालेली असल्यामुळे या प्रबंधासारखें शास्त्रीय दृष्टीने लिहिलेलें पुस्तक सहजासहजीं समजणें शक्य नाही. म्हणूनच या पुस्तकाचें परीक्षण करतांना आपल्याकडील लोकांनी घेतलेले आक्षेप निरर्थक ठरले आहेत.

याचा अर्थ असा नव्हे की नवी शास्त्रीय परंपरा निर्माण होण्याचा संभव नाही. फक्त ती अतिशय मंदपणाने होत आहे. याचें दुसरें कारण हेंहि आहे की उत्कृष्ट ग्रंथांच्या आधाराने पुढील संशोधन न करतां अशा ग्रंथांचें संकलनात्मक पुनर्लेखन करणें किंवा त्यांचें अनुकरण करणें इकडेच अधिक लक्ष दिलें जातें.

श्री. पानसे यांचा जुन्या मराठीवरील प्रबंध त्यांच्या दीर्घ परिश्रमाची आणि मराठीच्या भाषाशास्त्रीय अभ्यासाच्या सूक्ष्म परिचयाची साक्ष देतो. ही पूर्व तयारी तर प्रशंसनीय आहेच पण शिवाय ज्ञानेश्वरी वरील भाषाशास्त्रीय साहित्याचें त्यांनी केलेलें दोषदिग्दर्शन त्यांची अभ्यासकाची दृष्टि दाखवून देते. परंपरेने विद्वान् मानल्या गेलेल्या लेखकांवरील मुद्देसूद टीका अभ्यासाने उत्पन्न होणाऱ्या आत्मविश्वासाची द्योतक आहे.

६५५ पानांच्या या ग्रंथांत उपोद्घात ( १–१९ ), लेखनपद्धति ( २०–२९ ), वर्णविचार ( ३०–६७ ), रूपविचार (६८–१०६), पांचव्या अध्यायाची पूर्ण संहिता ( १०७–११४ ) विप्रसंहितेची सहा प्रसिद्ध आवृत्त्यांशीं तुलना ( ११५–११७ ), पांचव्या अध्यायांतील शब्दांचा व्युत्पत्तिकोश ( ११८–१५० ), ग्रंथसूचि ( १५१–१८० ), ज्ञानेश्वरीची संपूर्ण शब्दसूचि ( १८१–६४८ ), परिशिष्टें, शुद्धिपत्र, इ. ( ६४९–६५५ ), एवढे विषय आहेत.

मूळ प्रबंध जवळजवळ दीडशे पानांचा आहे. प्रबंधाचें नांव ‘ ज्ञानेश्वरीचीं भाषिक वैशिष्ट्यें ’ असें असलें तरी त्याचा खुलासा मात्र कुठेच आलेला नाही. ‘ वैशिष्ट्यें ’ या शब्दाने जो अर्थ सूचित होतो तो या ग्रंथाच्या विवेचनांत कुठेंहि आढळत नाही, पण पा १४ वर आलेल्या एका विधानाकडे पाहतां जुन्या मराठीचें यथार्थ स्वरूप काय होतें ( to establish the true usage of O.M. ) हें निश्चित करण्याचा या प्रबंधाचा हेतु दिसतो. शिवाय प्रत्येक ठिकाणीं ‘ जुनी मराठी ’ हा शब्द वापरला असल्यामुळे आपण देत असलेलें वर्णन त्या भाषेचें आहे असा लेखकाचा रोख दिसतो. पण काटेकोर भाषेंत म्हणायचें झालें तर हें जुन्या मराठीचें वर्णन नव्हे, ज्ञानेश्वरीचेंहि नव्हे. हें ज्ञानेश्वरीच्या विप्रसंहितेचें व्याकरण आहे.

ज्ञानेश्वरीचें भाषाशास्त्रीय महत्त्व तिच्या जुनेपणांत आहे. गीतेवरील ही टीका लोकप्रिय झाली आणि तिच्याबद्दल आदर व भक्ति निर्माण होऊन तिचें पारायण करतां यावें या हेतूने तिच्या असंख्य प्रति लिहिल्या गेल्या. मूळ ग्रंथाचें भाषावैशिष्ट्य कायम रहावें ही कल्पनाहि त्याकाळीं दुर्मिळ. संस्कृत ही मृत भाषा असल्यामुळे आणि तिच्या व्याकरणाची लोखंडी चौकट तयार असल्यामुळे संस्कृत ग्रंथांच्या प्रति तयार करतांना लेखनप्रमाद होण्याचा संभव कमी होता. पण बोलभाषेंतील जुन्या ग्रंथांच्या प्रति तयार करतांना लेखकाच्या बोलीचा आणि एखाद्या ग्रंथाच्या भाषावैशिष्ट्याच्या अज्ञानाची छाप या प्रतींवर पडणें, ही स्वाभाविक गोष्ट आहे.

या कारणामुळे विप्रसंहितेचा लेखनकाल ही बाब महत्त्वाची ठरते. मूळ प्रतीच्या काळांत शतं स्थानचा आंकडा उडून जाऊन १–७२ स्वरूपांत तो आहे. म्हणून तो १२७२ च आहे असा डॉ. हर्षे यांचा आग्रह आणि डॉ. पानसे यांनी त्याला दिलेली पुष्टि स्वीकार्य नाहीत. हें हस्तलिखित १२७२ नंतरचें असावें याबद्दल निश्चित पुरावा पुढे आणण्यांत आलेला नाही (पा. ९ टीप ११), हा लेखकाचा मुद्दा गैर आहे. लेखनकाल योग्य पुराव्याने पटवून दिला पाहिजे. तो अमुक नाही असें सिद्ध करा, हें आव्हान अयोग्य होय. जुन्या मराठीचें स्वरूप इतर साधनांनी निश्चित करून या प्रतींतील भाषा तिच्या कसोटीला उतरते असें दाखवण्याचा तरी १२७२ च्या पुरस्कर्त्यांनी प्रयत्न करावा.

हस्तलिखिताच्या लेखनपद्धतीचा परिचय अतिशय सूक्ष्मपणें करून देण्यांत आलेला आहे. पण या सदराखाली दिलेली माहिती कांही ठिकाणीं वर्णविचाराखाली यायला हवी होती. उदाहरणार्थ न + क्रियापद हीं एकत्र येऊन क्रियापदाच्या आरंभीं स्वर असल्यास नचा न् होतो आणि व्यंजन असल्यास नमधील अ व या व्यंजनानंतरचा स्वर यांच्या स्थानांची अदलाबदल होते (न आवडे = नावडे, न उरे=नुरे, न देखे = ने दखे, न जोडे = नोजडे; पण या व्यंजनानंतर लागोपाठ दोन स्वर आल्यास नमधील अ नाहीसा होऊन पहिला स्वर त्याच्या जागीं येतो (न देई = नेदी, न होए = नोहे). हा ध्वनिविषयक नियम आहे, लेखनवैशिष्ट्य नव्हे. तसेंच कोठौनि–कोठुनि यासारख्या रूपांत पहिलें रूप कालदृष्टया अगोदरचें आहे. विप्रसंहितेच्या लेखनकालीं औ > उ इतकें परिवर्तन झालें होतें असें म्हणतां येईल.

ह् + म् हा वर्ण प्राआभाषेंत म् + ह् असा 'लिहिला जातो' हें विधानहि चुकीचें चुकीचें आहे. हें वर्णविपर्ययाचें उदाहरण आहे. ह-पूर्व वर्णसंघांत हा विपर्यय होण्याची घटना फार जुनी आहे. मह्य याचें मय्ह असें परिवर्तन झाल्यामुळेच पुढे त्याची उत्क्रांति मज्झ अशी झालेली आहे.

वर्णविचार या सदरांत लेखकाने दिलेली यादी तत्कालीन ध्वनींची नसून अक्षरांची आहे. कोणतें अक्षर कोणत्या ध्वनीसाठी वापरलेलें आहे हें भाषेच्या इतिहासावरून ठरवायचें असतें. एकच लिपि ध्वनि बदलले तरीहि वापरण्याची परंपरा सर्वत्र रूढ असल्यामुळे आणि शब्दांचें लेखन हें उच्चाराप्रमाणे बदलण्याची सवय दिसून येत नसल्यामुळे कोणत्याहि काळांतील भाषेचे ध्वनि ठरवतांना लिपीच्या मर्यादा लक्षांत घेतल्या पाहिजेत. 'विष' असा लिहिला जाणारा शब्द उच्चारांत वीस् असा आहे; येथे संस्कृतांत दंतौष्ठ्य असलेला व् केवळ ओष्ठ्य आहे; ऱ्हस्व इ दीर्घ झाली आहे, मूर्धन्य ष् तालव्य बनला आहे आणि अंत्य अ लोप पावला आहे. म्हणजे लेखनांत संस्कृतचें लेखन जसेंच्या तसें ठेवणारा हा शब्द उच्चारांत पूर्णपणें बदलला आहे.

श्री. पानसे यांच्या यादींत अनुस्वार दिलेला नाही आणि ङ् व ञ् हे अनुनासिक वर्णहि नाहीत. लेखनांत ङ्, ञ् हे वर्ण नसतील, पण मग सांगडें, चांगला किंवा उंच पिंजरी यांतील बिंदूंचें कार्य काय? या शब्दांतील बिंदु व आतां, मागां यांतील बिंदु वेगळे नाहीत काय? यांतले उच्चारभेद इतिहासाने नक्की करून त्यांचीं ध्वनिमूल्यें ठरवणें हें लेखकाचें काम होतें.

तसेंच तालव्य वर्गात आज दिसून येणारा उच्चारभेद ज्ञानेश्वरकालीन भाषेंत होता की काय याचेंहि विवेचन केलेलें नाही. ज्या ज्ञानेश्वरींत शचा सर्रास स् होतो (पुढे तालव्य स्वर आला असतांहि : सेवटीं, सीं, सेजार, सेत, सिंपणें) तिथे तालव्य वर्णांचेहि सर्वत्र दंत्य

बनणें स्वाभाविक आहे. याच कारणासाठी उसन्या शब्दांत असणारे श्, ष् हे जुन्या मराठीच्या उच्चारांत समाविष्ट करणें अयोग्य आहे.

ज्ञानेश्वरपूर्व महानुभाव वाङ्मयांत आढळणारा ळ् हा वर्णहि वर्णमालेंत दिलेला नाही. विप्रप्रतींत तो कांही ठिकाणीं स्पष्टपणें वेगळा दाखवलेला आहे ( पा. १० ). हीं सर्व स्थळें येथे नमूद करणें इष्ट होतें. हें अक्षर जुन्या देवनागरींत दुर्मिळ असल्यामुळे मराठींत त्याचें लेखन करतांना अडचण उत्पन्न होणें किंवा कित्येक ठिकाणीं नवीन स्वीकारलेलें चिन्ह ( ल्ल ) लक्षांत न राहून ळळचें सारखेंच लेखन होणें शक्य आहे. एकाच चिन्हाने हे दोन्ही ध्वनि व्यक्त करण्याची पद्धत देखील कांही हस्तलिखितांनी स्वीकारली असेल. ज्याप्रमाणे च हा वर्ण तालव्य कुठे वाचायचा आणि दंत्य कुठे वाचायचा हें आजच्या वाचकाला समजतें, त्याचप्रमाणे ल दंत्य कुठे व तालव्य कुठे हें ज्ञानेश्वरकालीन वाचकाला माहीत होतें असें म्हणायला हरकत नाही.

ळच्या जुन्या मराठींतील अस्तित्वाचा पुरावा टिळा, डोळस, डोहळा, इ० शब्दांत सापडतो. या शब्दांतील स्वरमध्यस्थ-लचा आधी ळ झाला आणि त्याच्या आकर्षणाने दंत्य त् व द् हे वर्ण ट् व ड् असे बनले. म्हणजे लचा ळ ही घटना पूर्वीची आहे.

अशा रीतीने ध्वनींचा विचार ऐतिहासिक दृष्टीने केला असता तर विवेचन अधिक सशास्त्र व वस्तुस्थिति दाखवणारें बनलें असतें. पान १३ वर दिलेलें डॉ. कत्रे यांचें भाषेचा अभ्यास कसा करतां येतो या विषयीचें मत शब्दशः मान्य केल्यामुळे हा दोष उद्भवतो. तें मत हें : कोणत्याहि काळची भाषा दोन मार्गांनी अभ्यासतां येते.(अ) त्या काळच्या कोणत्याहि महान् ग्रंथाचा सूक्ष्म अभ्यास; आणि ( आ ) त्याकाळच्या एकंदर साहित्यांतील निवडक पुराव्याचा तौलनिक अभ्यास. पण पूर्णपणें एकाच ग्रंथावर आणि तेंहि एकाच हस्तलिखितावर आधारलेलें विवेचन भाषेच्या दृष्टीने असमाधानकारकच ठरेल. भाषेचा अभ्यास ( भाषा ही एकसारखी उत्क्रांत होत जाणारी सामाजिक संस्था असल्यामुळे ) ऐतिहासिक व तुलनात्मकच असला पाहिजे. या तुलनेसाठी लीळाचरित्र, गोविंदप्रभुचरित्र, महानुभावांचा सूत्रपाठ आणि इतर कांही साहित्य अतिशय उपयोगी पडलें असतें. ही तुलना ज्ञानेश्वरीचीं भाषाविषयक 'वैशिष्ट्यें' दाखवण्यालाहि उपयुक्त ठरली असती. त्याचप्रमाणे अतिशय काळजीपूर्वक आणि मेहेनतीने तयार केलेल्या रूपविचाराला ती पूर्णता आणूं शकली असती.

या तुलनेच्या अभावामुळेच व्युत्पत्ति या सदरांत कांही दोष झालेले आहेत. हा कोश त्याचप्रमाणे संपूर्ण शब्दसूचि लेखकाने पुन्हा एकदा पाहून जाणें इष्ट ठरेल. ध्वनिविषयक उत्क्रांतींत केवळ ध्वनिपरिवर्तनाचे नैसर्गिक नियम उपयोगी पडत नाहीत. विपर्यय, सदृशीकरण, वर्णग्रास, इ. बौद्धिक नियमांचें अस्तित्व लक्षांत घेतल्यास विवेचन अधिक सुलभ व शास्त्रीय झालें असतें. यासाठी ग्रामाँ यांचा Triate de Phonetique यासारखा ग्रंथ नजरेंतून घालणें जरूर होतें. ग्रंथसूचि मोजक्या उपयुक्त ग्रंथांचीच देऊन आटोपशीर करतां आली असती.

मात्र या प्रबंधाच्या निमित्ताने केलेली तयारी अधिक पुढे नेऊन जुन्या मराठीचें संशोधनाला नवें व इष्ट वळण लावण्याचें कार्य लेखकाकडून यापुढे होईल अशी अपेक्षा बाळगणें अयोग्य ठरणार नाही.

—नारायण गोविंद कालेलकर

अनुक्रमणिका

लोकसाहित्याचें लेणें— ( ले० सौ. मालतीबाई दांडेकर, बुधगांव. पृ. ३६३ किं. ६ रु. )

आतापर्यंत बायकांच्या तोंडीं असलेल्या पण ' ग्रथित ' न झालेल्या—छापून न निघालेल्या-अशा अनेक ओव्या अनेक थोरामोठ्यांनी संपादून प्रसिद्ध केल्या. साने गुरुजींनी स्त्रीजीवनाचे दोन भाग तयार केले. डॉ. कमलाबाई देशपांडे यांचें ' अपौरुषेय वाङ्मय ,' वामनराव चोरघडे यांचें ' साहित्याचें मूलधन, ' पां. श्रा. गोरे यांची ' वऱ्हाडी लोकगीतें, ' डॉ. नांदापूरकर यांचें ' माहेरचें मराठी ' अशीं किती तरी पुस्तकें सांगतां येतील. शिवाय अनसूया ( लिमये ) भागवत, दुर्गा भागवत, यांनीहि मधूनमधून आपल्या संग्रहांची ओळख वाचकांना करून दिली आहे. हीं लोकगीतें लोकांपुढे मांडतांना रसग्रहणाची, त्यांची गोडी चाखण्याची रीतहि आमच्या परिचयाची झाली आहे. त्यांतच त्या नव्या " लेण्या "ची नवी भर सौ. मालतीबाईंनी घातली आहे.

या पुस्तकाचे एकंदर चार भाग मिळून ३६३ पृष्ठें होतात. स्नेहसंबंध व कृषिजीवन हा पहिला भाग. त्यांत सुमारें सव्वातीनशें ओव्या आहेत. दुसऱ्यांत अकरा विषयांवरच्या १५०० ओव्या असल्याने तो जरासा फुगला आहे. त्यांतली विषयविल्हेवारीदेखील जरा ढिली झालेली दिसते. माहेर, माहेरचे आप्तेष्ट, बंधुराय हे तीन विभाग एकत्र करतां आले असते. त्याचप्रमाणे तान्हुलें, बाळराज, मुलगी हे तीन निरनिराळे विषय करण्याची जरूरी नव्हती. तिसऱ्या भागांत समाजदर्शन, भाविकता आणि स्त्रीजीवन अशा तीन मथळ्याखाली ओव्या दिल्या आहेत. त्यांचें वर्गीकरण आणखीहि वेगळ्या प्रकारांनी करतां आलें असतें. पण अनुक्रमणिकेंत दाखविलेल्या मथळ्याहून अगदी निराळे मथळे किंवा पोटमथळे देऊन त्यांत विविधता साधलेली आढळते. वर्गीकरण काय अनेक प्रकारें करतां येतें आणि त्याबाबत एकवाक्यता सहसा होत नाहीं.

लोकांच्या तोंडीं असलेल्या या ओव्यांचा संग्रह करणें हेंच मोठें दगदगीचें व त्रासाचें काम आहे. अशिक्षित व अ( न )पढ अशा खेडवळ बायकांकडून हीं गीतें मिळवून तीं टिपून, विशिष्ट प्रकारें त्यांचें वर्गीकरण करणें ही कामगिरी विशेष मोलाची असते. सौ मालतीबाई दांडेकर यांनी ती छान बजावली आहे.

या संग्रहांत पुष्कळ निवडक रत्नें सापडतात. साधेपणा हाच त्यांचा विशेष असल्याने या ओव्या अलंकृत आहेत असें म्हणतां येत नाही. परंतु त्यांचें सौंदर्य, माधुर्य किंवा त्यांचा प्रभाव बहारदार वाटतो. त्यांत किती तरी अर्थ खचून भरला आहे. अनेक पिढ्यांच्या अनुभवाचें सार त्यांत साठविलेलें आहे हेंहि सहज समजतें.

बाप समिंदर, बया माझी गोदायण
काशीला जाते वाट, दोनीच्या मधयानं ॥ (पृ. ६७)

या ओवींत केवढें व्यवहार—ज्ञान भरलें आहे ! पितरांच्या ठायीं तीर्थांची कल्पना समजावून सांगण्यासाठी श्रीकृष्णद्वैपायन व्यासांनी वनपर्वांत एक उपाख्यानच रचिलें; तर आमच्या कृष्णाकांठच्या या अडाणी ' अनामिक ' कवयित्रीने ' सागरे सर्व तीर्थानि ' या सुभाषिताचा आशय दोन साध्या शब्दांत व्यक्त केला आणि ' बाप समिंदर ' आहे असें सुचविलें. आईबापांची सेवा प्रेमभावें केल्यावर काशीयात्रा कशाला हवी— ही शिकवण अनेक गुरूंनी अनेक

वेळां भारतीयांना दिली आहे. तिचाच हा ग्रामीण व्यवहारांतला संक्षिप्त अवतार असल्याने तो कौतुकास्पद ठरतो.

घरगुती सुखदुःखें बायका किती खुबीने व्यक्त करतात पाहा—

आईबापाच्या राज्यामंदी तांब्या तुपाचा केला रिता
भावजईच्या राज्यामंदी पानी घ्याया न्हाई सत्ता (पृ.७५)

या दोन ओळींत सामावलेली कहाणी स्पष्टपणें सांगण्यास किती तरी ओळी लिहाव्या लागतील. पूर्वीचें वैभव, आईबापांचें प्रेम, त्यांचा दिलदार स्वभाव, त्यांच्या पश्चात् भावाचा नवा संसार, त्याची बाइलबुद्धि, भावजईचा जाचक स्वभाव— यामुळे बहिणींची होणारी कुचंबणा... किती थोडक्यांत व्यक्त होते आहे !

श्रीमंती श्रीमंती सोन्याहोनाची काय कामाची ?

खरी गृहिणी देवाजवळ काय मागत असते तर —

दे रे देवा मला नकोत सोन होन
मांडीवरी देई इसाव्याला तान्हं ॥ (पृ. १८५)

अशा अर्थपूर्ण—व्यवहारपूर्ण — ओव्या या साहित्याच्या लेण्यांत कितीतरी आहेत !

उथळ पान्यामंदी घागर बुडयेना
शेजीच्या बोलन्याचा मला इसर पडयेना (पृ.२३७)

नळावर पाणी भरण्याची सवय असलेल्यांना हा उथळ पाण्यांतला अनुभव बहुधा नसतो. त्यांना या सूचित अर्थाचें मर्म चटकन् समजावयाचें नाही पण जाणत्यांना या ओळीचा विसर पडणार नाही. अशा मोलाची ती आहे. त्याचप्रमाणे—

मायेच्या वांचून कशाचा मैत्रपणा ?
मिठाच्या वांचून रुचि न्हाई पकवाना ! (पृ. ३२९)

'लोकसाहित्याचें' लेणें हें नुसतें संग्रहात्मक असतें तर त्याची किंमत अधिक ठरली असती. आणि रसग्रहणाची झाकली मूठ सवा लाखाची ठरली असती. वास्तविक साने गुरुजी, कमलाबाई, अनसूयाबाई, दुर्गाबाई, वामनराव चोरघडे इत्यादिकांनी अशल्या लोककाव्याचें रसग्रहण इतक्या विविध प्रकारांनी केलें आहे की त्याबाबत नवें असें सांगण्याचें उरलें नाही. म्हणून यानंतर असला कुणाचाहि प्रयत्न अळणी ठरला असता. स्वतः रस चाखून इतरांना ती गोडी चाखविण्यासाठी जी तयारी हवी असते ती नसल्यामुळे असेल कदाचित्, सौ. मालतीबाई दांडेकरांचा हा प्रयत्न व्हावा तितका यशस्वी झाला नाही. किंबहुना असेंहि असावें की या लोकगीतासंबंधी खुद्द संग्राहिकेची समजुत अगदी निराळी असल्याने आमची निराशा होते. ह्या ओव्या ग्रामीण बायका म्हणतात, रचतात, किंवा गातात, त्या विशिष्ट प्रसंगानुसार नव्हे. रहाटे रामपाऱ्यांत, दळतांना कांडतांना, शेतांत राबतांना, ओझीं वाहातांना, श्रमपरिहारार्थ त्यांचा अधिक उपयोग आहे. परंतु सौ. मालतीबाईंची समजूत वेगळी दिसते. त्यांना वाटते की निरनिराळ्या प्रसंगानुसार आधुनिक शहरी कवि हुकमेहुकूम काव्यें प्रसवतात, तशाच या ग्रामीण गृहिणी शिंप्याशीं बोलतांना, बांगड्या भरतांना, लग्नसमारंभाच्या वेळा, काव्यें करतात. ह्या ओव्या उत्स्फूर्त असल्या, त्यांचें कच्चें-पक्कें टांचण नसलें तरी विशेष प्रसंगानुसार तयार केलेलें—उत्सवसमारंभासाठी बनविलेलें—काव्य हें नव्हे; या गैरसमजुतीमुळे रसग्रहणांतहि थोडा दोष आला आहे. वाङ्मय, साहित्य, पांढरपेशा आणि ग्रामीण जनता, शाळा, शिक्षण, ज्ञान-प्रसार, या संबंधीच्या सौ. मालतीबाईंच्या कल्पनाहि विपरीत असाव्या असें दिसतें. पृ. ३४९

पासून अखेरीपर्यंत " शब्दसमृद्धि " म्हणून त्यांनी जें विवेचन केलें आहे त्यावरून हीच कल्पना बळावते.

बायकांची भाषा घरगुती व सहज वाहाणारी असावी ही अपेक्षादेखील फोल ठरते. विशेषतः लोकसाहित्याची गोडी चाखवितांना इतकी कृत्रिम व ओबडधोबड भाषा आमच्या वाट्यास यावी याबद्दल वाईट वाटतें. साध्या सूर्यप्रकाशाइतक्या स्पष्ट गोष्टी पटविण्यासाठी सौ. मालतीबाई दांडेकर म्हणतात :

"सासर नि माहेर हे स्त्रीच्या आयुष्याचे दोन प्रमुख विभाग.जणू एखाद्या कादंबरीचा ?) पूर्वार्ध नि उत्तरार्ध असे दोन विभाग असावे, त्याप्रमाणे हे दोन्ही खंड महत्त्वाचे असतात." ( पृ. १११ ) यांतील क्रम आहे तोच मानला तर सासर पूर्वार्ध ठरतें ! प्रत्येक कादंबरीला हे दोन ' खंड ' असतातच की काय ?

कैकेयीला पहिली कठोर सासू ठरवून तर एक नवा शोध लावल्याचें श्रेय संग्राहिकेने घेतलें आहे ( पृ. १३७ ) कार्यकारणभावाचा विपर्यास करण्याची हातोटी पाहा—

" नद्याकाठी बहुधा क्षेत्रें वसलेलीं आढळतात. देवांचीं देवळेंहि या नद्यांच्या सान्निध्यांत असतात. फार काय, साधुसंतांच्या समाधी (!) देखील नदीतीरावर बांधलेल्या पुष्कळदा दिसून येतात. " ( पृ. २६५ ) असो.

" अपरिचित शब्दांचे अर्थ " दिल्याबद्दल संग्राहिकेला धन्यवाद. मात्र कित्येक चुकीचे अर्थ दिले आहेत ते सांगणें जरूर आहे. लुगड्यांचे ' वाण, ' बांगड्यांचीं नांवें, सौभाग्यचिन्हें यांचेहि बरोबर अर्थ सौ. मालतीबाईंनी दिले नाहीत याचें आश्चर्य वाटतें. " पोफळी " लुगडें म्हणजे दुहेरी चौकटी विणलेलें असतें खरें. पण कन्येचा, सूनबाईचा वर्ण " पोफळी " म्हटला आहे तेथे ' पोफळ ' ( सुपारी ) असा अर्थ होतो हें उघड आहे. ( झाडावर ) पिकलेलें पोफळ ' सुवर्णी ' असतें. स्त्रियांचा वर्ण ' केतकी ' सारखा, पिकलेल्या लिंबासारखा, हळदीसारखा, म्हणतात; त्याप्रमाणे ( तसलाच ) पोफळीहि रंग होय. ' अत्तार ' म्हणजे, अत्तरें, सुगंधी द्रव्यें विकणारा म्हणून तो कुंकूहि विकतो. पाटावे व पैठणी हे वस्त्रप्रकार एक नव्हत. वुत्ती म्हणजे कालविलेला दहिभात. बळद म्हणजे तळघर. धपाटे( धपाटी ) व थालिपीठें एक नव्हत. थालिपीठांना तेल पुष्कळ लागतें तर धपाटे ( टी ) तव्यावर भाजून-परतून काढतात. " स्त्रीचें तर लहानपणीं लग्न होणार " ( पृ. २४२ ) असें सांगून काढलेलीं अनुमानें विनोदी वाटतात. खेडेगावीं झालं तरी एकट्या " स्त्रीचं " कांही लग्न होत नाही ! " शालेय ज्ञानाचा अभाव" म्हणून खेडवळांना इतकें हिणवून काय साधतें कळत नाही. शिक्षण आणि ज्ञान यांमधील फरक सौ. दांडेकरांना उमगलेला दिसत नाही. या हिणवणाऱ्या वाक्याची पुनरावृत्ति या 'लेण्यां' त किती वेळां झाली आहे हें पुनः तपासून पहावें अशी सौ.मालतीबाईंना आमची विनंती आहे.

—श्री. रा. टिकेकर

प्राची—[ कवि : प्रा. गो. म. कुलकर्णी प्रकाशक-दा. ना. मोघे, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर. किं. १।। रु. ]

' रसग्रहण ' हें रसिकांच्या प्रशंसेस पात्र ठरलेलें पुस्तक लिहिणारे, विजापूरच्या विजय कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक गो. म. कुलकर्णी यांच्या कवितांचा हा पहिलाच संग्रह आहे.

आज मराठी कवितेचें नवस्वरूप विविध रीतींनी आविष्कृत होत आहे. ज्या त्या कवींच्या प्रकृतिवैशिष्ट्यानुसार त्यांत नवनव्या जाणिवा प्रत्ययास येत आहेत. जीवनाच्या केवळ रम्य-कोमल स्वरूपाचें सुभग दर्शनच तेवढें न दिसतां जीवनाचीं भग्न, विदीर्ण व अस्थिर रूपें दर्श-विणारें—सत्यदर्शी काव्यहि आज लिहिलें जात आहे. श्री. कुलकर्णी यांची कविता जीवना-च्या विविध खऱ्या अनुभूतींशीं इमान राखणारी अशीच आहे.

या छोटयाशा कवितासंग्रहांत, कविमनाच्या भोवतालच्या कोलाहलाविषयींच्या विविध प्रतिक्रिया पाहावयास मिळतात. विशेषत: आजच्या सहस्रशीर्ष सहस्रपाद समाजपुरुषाचें दर्शन घेत असतांना मनाची झालेली व्याकुळ तडफड अनेक कवितांत दिसते. सामाजिक दु:खें, अन्याय, दारिद्र्य, विषमता यांच्या दर्शनाने व मनन-चिंतनाने उठलेले विचारतरंग अनेक कवितांचा अंतस्तल बनलेले आहेत. प्रक्षोभ हाच येथील अनेक कवितांचा स्थायीभाव. कवितेंत व्यक्त होणारी अनुभूति-मग ती कोणत्याहि स्वरूपाची असो-उत्कट हवी. तशी ती असली म्हणजे कवितेचें आवाहन रसिकाच्या हृदयास तात्काळच जाऊन पोचतें. श्री. कुलकर्णी यांच्या कवितांत ही अनुभूतीची उत्कटता अनेकदा अनुभवावयास मिळते. 'कथा पुराणी,' 'पर्वणी,' 'उकिरड्यांत,' 'फलश्रुति' इ. कविता आजच्या पिढीचीं आंतलीं दु:खें बोलक्या करणाऱ्या अशाच आहेत.

कवीच्या समाजनिरीक्षणांतील वारकाव्याचीहि साक्ष हा संग्रह वाचतांना वारंवार पटते. आज आपण मोठमोठ्या ध्येयाच्या बाता ओठावर खेळवितों, पण हातून कृति मात्र नेमकी उलट होते! प्रत्यक्षांत क्षुद्रत्वाचें दर्शनच फार होतें, अशा विचारानुभव उपहास-उपरोधाच्या साहाय्याने कांही कवितांत मांडला गेला आहे. 'मुंग्यापरी मानवांची—लागे अखंड ही रांग,' 'आत्मीयता न कशांत—नाही मूळचा जिव्हाळा,' 'फुटक्या कवड्या मुठींत ठेवुनि, म्हणतो हातीं अनर्घ्य मूल्यें' अशा ओळींतून प्रगट झालेलें सत्य कटु असलें तरी प्रत्ययास येणारेंच आहे.

या कवीचें मन, सध्या तरी, सद्य:स्थितिविषयक "उपहासाच्या व उद्वेगाच्या जाणिवेने"च भरून गेलेलें आहे. या जाणिवेचा बहुविध आविष्कार म्हणजे प्राची... शांत-तेच्या मेजावरच युद्धाचे कोळसे फुलविले जात आहेत: द्रौपदीची अब्रू घेणारी कौरवांची सभा अजून नित्य भरतच आहे व अर्थदासांनी मान खाली घातलेलीच आहे: भक्तीचा बाजार मांडलेला पाहून देवाला दुरूनच नमस्कार करण्याची इच्छा होत आहे: विष बाहेर निघालें तरी मंथन चाललेंच आहे:—अशा अनेक रूपकांतून कविमन एकाच भावाची भाषा बोलत आहे. एकच आक्रोश येथे कानीं पडत आहे. मात्र यांत सचेपणा आहे. नवा जमाना सुरू झाला तरी तथाकथित उच्च मूल्यांची जुनीच कथा कोणी घोकत आहेत, परंतु नव्या पिढीच्या अंतरींचा कोलाहल तसल्या नुसत्या पोपटपंचीने कसा शांत होणार!

अर्थात् 'प्राची'मध्ये जीवनाच्या सद्य:स्वरूपाविषयींची अशी चीड असली तरी ती जीव-नाच्या मंगल रूपाच्या अपेक्षेने निर्माण झालेली आहे. जीवनाचें निरागस रूप अनुभवास येण्यासाठी व व्यक्तिमात्राच्या सुखाची आणि विकासाची वाट मोकळी होण्यासाठी ठायीं ठायीं अनुभवास येणारी कुरूपता नष्ट झाली पाहिजे हाच विचार 'प्राचीचें' वाचन संपवितांना मनांत घोळत राहातो. कवीचें मन ज्ञानेश्वरांपाशी 'ताटी खोलण्याची' याचना करीत आहे. "कथा ऐका हो आमुची—ऐका निर्वाणीच्या हाका। आणि अंधारीं या दावा—नवी भावार्थ-दीपिका" हें आहे कवीचें मागणें मनचें. याच्याशीं कोण सहमत होणार नाही?

श्री. गो. म. कुलकर्णी यांच्या ' प्राचींत ' मुग्धकोमल व सुमधुर भाव–भावनांचें संगीत नाही असा आक्षेप कोणी घेईल,—पण कवीचा जीव, वर सांगितल्याप्रमाणे, ' ताल जमेना, सूर मिळेना ' अशा अवस्थेने संतप्त झाला आहे व तेवढीच अनुभूति तो प्रामुख्याने व्यक्त करीत आहे. अर्थात्—प्राची, जळलेला मोहर, स्मृतिदोष साम्राज्य, दृढ मधुर मिठी, यांसारख्या कवितांत उपरोक्त सुरांहून वेगळे सूर ऐकावयास येतात हेंहि येथे नमूद केलें पाहिजे. प्रस्तावनाकार श्री. दि. के. बेडेकर यांनी प्रस्तावनेंत भावकविता व भावगीत यांतील भेद स्पष्टपणें नोंदविला आहे तो लक्षणीय आहे.

—वि. म. कुलकर्णी.

सुवास आणि रस—[ प्रा. भ. श्री. पंडित. प्रकाशक–व्हीनस बुकस्टॉल, पुणें २. किं. रु. २–८–०. ]

' सुवास आणि रस ' हा प्रा. भ. श्री. पंडित यांचा तिसरा काव्यसंग्रह. प्रथितयश भावगीत कवि या नात्याने 'पिचलेला पावा' आणि 'उन्मेष आणि उद्रेक' या त्यांच्या पूर्वीच्या काव्यसंग्रहांनी रसिकांना त्यांचा परिचय करून दिलेलाच आहे. तारुण्यसुलभ प्रणयभावना आणि वैयक्तिक जीवनांतील सुखदुःखें यांचीं चित्रें काढण्यांतच त्यांची प्रतिभा या काळांत रमून गेली होती. त्यांच्या प्रतिभेचें स्वरूप या काळापर्यंत प्रामुख्याने वैणिक होतें. ' सुवास आणि रस' या संग्रहांतील कवितांवरून मात्र त्यांच्या प्रतिभेने निराळें वळण घेतल्याचें स्पष्ट दिसतें. ती आता अधिक सामाजिक होऊं लागली, मानवतेचीं नवीं स्वप्नें पाहूं लागली, विश्वबंधुत्वाच्या घोषणा करूं लागली आणि श्रमजीवी वर्गावर होणाऱ्या अन्यायाने चिडून जाऊन क्रांतीच्या घोषणा करूं लागली. त्यांच्या कवितेला या संग्रहांतून हें जें वळण मिळालें आहे त्याची प्रा. पंडित यांनाहि जाणीव आहे, हें ' उन्मेष आणि उद्रेक ' ' या काव्यसंग्रहाच्या आरंभीं केलेल्या निवेदनांत या पुढील माझ्या कवितांस एक नवें वळण मिळालें आहे. ' या त्यांनी काढलेल्या उद्गारांवरून स्पष्ट दिसतें.

१९४३ ते ५३ या कालखंडांत लिहिल्या गेलेल्या कवितांचा या संग्रहांत अंतर्भाव करण्यांत आला आहे. दुसऱ्या महायुद्धापासून जगांत जें अस्थैर्य निर्माण झालें, मानवतेची जी सगळीकडे विटंबना होऊं लागली आणि महत्त्वाकांक्षी व सत्तांध राजकारणाला जो रंग चढला त्याचे परिणाम या काळांतील सर्वच विचारक्षम व संवेदनशील व्यक्तींच्या मनावर घडून आले. मराठी कवितेंत तर त्यामुळे एक निराळेंच युग निर्माण होऊं लागलें. रविकिरणमंडळाच्या काळांतील आत्यंतिक स्वयंकेंद्रितता जाऊन कवींची प्रतिभा आजुबाजूच्या जीवनाकडे व जागतिक घडामोडीकडे अधिक सहानुभूतिपूर्ण व अधिक डोळस दृष्टीने पाहूं लागली. त्यामुळे सामाजिक, राष्ट्रीय व जागतिक दृष्टिकोन त्यांच्या काव्यांतून कमीअधिक परिणत स्वरूपांत प्रगट होऊं लागला. कवि हा काळाचा प्रतिनिधि असतो हें या काळांत अधिक यथार्थपणें प्रत्ययाला येऊं लागलें. प्रा. पंडितसुद्धा त्याला अपवाद नाहीत. महत्त्वाकांक्षा व स्वार्थ यांमुळे मानव हा दानव होऊन जगाच्या संहाराला कसा उद्युक्त झाला आहे याची जाणीव या काळांत त्यांना तीव्रपणें झाली आणि त्यामुळेच ' कुठुन विश्वशांति ? ' असे निराशेचे उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडूं लागले. सत्ताधीशाच्या तोंडीं त्यांनी घातलेल्या गाण्यांतील खालील ओळी पाहा—

‘ टाकुनिया मानवता,
अंगिकारुं दानवता
पशु सारे
फार बरे
पटवुं ही प्रतीति ! ’

मानव असा दानव झाल्यावर जगांत शांति कुठून नांदणार ? म्हणून ‘ विमानास ’ उद्देशून लिहितांनाहि विमानाच्या स्वैर भरारीने त्यांना आनंद होत असला तरी दानव झालेला मानव शेवटीं त्या विमानाला घात करावयास शिकवील या कल्पनेने त्यांना विषाद वाटतो. ते म्हणतात–

‘ विश्वबंधुता कुठली;
शांतिदूतता कुठली ?
विसर; जों न मानवता देवता जहाली !

अणुबाँबचा ज्यावेळीं स्फोट झाला त्यावेळीं त्या घटनेने सारें विश्व हादरलें. प्रा. पंडितांच्या मनाचा या स्फोटाने उडालेला प्रक्षोभ ‘ शाप ’ या कवितेंत चांगला व्यक्त झाला आहे.

निष्ठुरांनो ! काय हें !
फेकुनी अण्वस्त्र केले जाय बंधू हाय हे !

असे उद्गार काढून ते शेवटीं बजावतात –

प्राण घेणारे नवे
शोध लावा नी तसे नाचा जसें तुम्हां हवें
हें धरा ध्यानीं परी
श्वास मेल्या चामड्याचा भस्म लोहाचें करी !

पैसा आणि सत्ता यांमुळे उन्मत्त झालेल्या या सामर्थ्यवान् बळीला पुन्हा दडपून टाकण्यासाठी ‘ वामनास आवाहन करतांना त्यांच्या मनांतील हाच प्रक्षोभ प्रकट झालेला दिसतो. पण अशा प्रतिकूल परिस्थितींतहि मानवतेचीं व विश्वबंधुत्वाचीं रम्य चित्रें रेखाटवयास त्यांची लेखणी कमी करीत नाही. ‘ विश्वच अवघें हें माझें घर ’ यामधील विश्वबंधुत्वाच्या भावनेचें चित्र मोठें उज्ज्वल आणि विशाल वाटतें. त्याउलट वर्णद्वेषाने आफ्रिकेमध्ये जो अनर्थ चालविला आहे त्यामुळे उफाळून क्रांतीची भाषाहि वर्णविद्वेष या कवितेंत त्यांच्या तोंडून बाहेर पडते. जागतिक परिस्थितीचें त्यांच्या काव्यांतून उमटणारे हे पडसाद असे प्रक्षोभक आहेत.

हीच प्रक्षुब्ध मनोवृत्ति व श्रमजीवी वर्गावर होत असलेल्या अन्यायाचें वर्णन करतांनाहि ठिकठिकाणीं प्रगट होते. ‘ श्रमजीवी चाकांनो ’ ‘ सुप्त ज्वालामुखे ’ ‘श्रमजीवी मधमाशांचा गुंजारव’ किंवा ‘ खालचा थर ’ या कविता वाचत असतांना, आर्थिक विषमतेबद्दल त्यांना वाटणारी चीड किती तीव्र आहे याचा प्रत्यय आपणांला आल्यावांचून राहात नाही. आणि म्हणून ‘ श्रमजीवी चाकांना ’

‘ तुम्हांस ठेवुन तिष्ठत कष्टत
आपण होई मात्र अधिष्ठित
उलथुन पाडा यास पालथे
उगवा याचा सूड यथास्थित ’

असाहि आदेश द्यावयास ते कमी करीत नाहीत.

५

त्यांच्या राष्ट्रीय वृत्तीचा आविष्कार त्यांच्या गेल्या दोन संग्रहांतहि अनेक कवनांतून झालेला आहेच. याहि संग्रहांत ' राष्ट्रध्वजास ' 'स्वतंत्र भारत' ' ध्वजवंदन ' अशासारख्या कांहीं कवितांतून त्यांची राष्ट्रीय भावना प्रगट झालेली दिसते. जातिभेद, प्रांतभेद किंवा धर्मभेद यांमुळे आपणामध्ये उत्पन्न झालेली दूरता नाहीशी व्हावी अशी उत्कट इच्छा त्यांच्या ' भाऊबंदकी ' ' भाऊ भाऊ ' अशा सारख्या कवितांतून आढळते. पण या राष्ट्रीय वृत्तींतून सुद्धा समता, स्वातंत्र्य व विश्वबंधुत्व या उदात्त कल्पना आविष्कृत झालेल्या आढळतात. ' २६-१-५० ' या कवितेंतील खालील पंक्ति पाहा—

' मानव तितुके समान, स्वतंत्र,
एकमेका देऊं साह्यासाठी हात
जागतिक ऐक्य करूं प्रस्थापित
मानवसेवेचें अंगिकारूं व्रत. '

असा त्यांचा राष्ट्रवाद व्यापक आहे.

त्यांच्या प्रतिभेला लागलेलें नवें वळण असें प्रक्षोभक व व्यापक स्वरूप धारण करतें. प्रक्षोभक घटना सतत सभोवतीं घडत असल्यामुळे या काळांत निर्माण झालेली कविता विराट-स्वरूपी, क्रांतिकारक व क्वचित् वैफल्यवादी झाली आहे. प्रा. पंडितांच्या काव्याचा विशेष हा की ते निराशेच्या व विफलतेच्या आहारीं गेले नाहीत. मानव हा दानव झाल्याचें त्यांना दिसत असलें तरी पुन्हा तो केव्हा तरी मानव होईल असा त्यांना दृढ विश्वास आहे. मानव हा देव-दानवांतील दुवा आहे असें त्यांना वाटतें. ' विश्वाचे अवघें माझें घर ' असा त्यांना विश्वास वाटतो. त्यामुळेच त्यांच्या प्रतिभेला मिळालेलें नवें वळण विलोभनीय वाटतें.

पण या जागतिक अस्थैर्याच्या काळांतहि त्यांच्यांतील भावगीतकार सतत जागा होता. आपल्या व आपल्या भोंवतालच्या जीवनांतील भाव-सौंदर्याचे क्षण तो टिपून घेत होता. ' विश्वाचि अवघें माझें घर ' अशा व्यापक कल्पनेंत विहार करीत असतांनाहि ' तें माझें घर ! तें माझें घर ! ' अशी स्वतःच्या घराचीहि त्यांना आठवण असते आणि आपल्या घराचें मोठें मोहक असें चित्रहि ते रंगवितात. विश्वबंधुत्वाच्या विशाल भूमिकेंत प्रवेश करीत असतांना दूरस्थ अपत्यांची आठवण होऊन त्यांच्या जीवाला एकटें एकटें वाटतें आणि मनाचा झालेला कोंडमारा मोठ्या कोमलतेने ते रंगवितात. सामान्य जीवनांतील भावसौंदर्याचे हे क्षण पहातांना भावगीतकार म्हणून त्यांनी आतापर्यंत मिळविलेल्या कीर्तींत या संग्रहांतील भाव-गीतांनी भरच पडली आहे असें वाटल्याशिवाय राहात नाही. प्रा. पंडित यांच्या प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यय आपणांला या भावगीतांतून येतो आणि म्हणून तीं आपणाला कदाचित् त्यांच्या प्रक्षोभक गीतांपेक्षाहि अधिक जवळचीं वाटतात.

मराठीमध्ये सुनीतरचना अलीकडे बरीच दुर्मिळ होत चालली आहे. त्याला लागणारा रचनेचा संक्षेप आणि तत्त्वचिंतनशील वृत्ति प्रा. पंडितांच्या ठिकाणीं पुष्कळच प्रमाणांत आढळते. ' ताजमहाल ' ' सीमोल्लंघन कोठलें ? ' ' श्रीलक्ष्मीस ' अशीं कांही सुनीतें सुनीतांच्या दुर्भिक्षाच्या आजच्या काळांत विशेष उल्लेखनीय वाटतात.

प्रा. पंडितांच्या ' सुवास आणि रस ' या काव्यसंग्रहाचें स्वरूप हें असें आहे. प्रा. पंडित रसिकांना ' मला माझ्या काव्यांत पहा ' अशी विनंती करतांना म्हणतात—

''वास पुष्पांतुन काढतां न येई
मीहि काव्यापासून भिन्न नाहीं

[ यापुढील मजकूर पान ३९ वर पहा. ]

# मराठीचिये नगरीं : संपादक

## गोमंतक मराठी साहित्य संमेलन

गेल्या एप्रिलमध्ये कारवार येथे भरलेल्या ‘ गोमंतक मराठी साहित्य संमेलना ’ चा परामर्श जागेच्या अभावीं, मागील अंकांत घेणें अशक्य झाले होतें म्हणून त्याचा उल्लेख या अंकांत करीत आहे. प्रस्तुत संमेलनाच्या अध्यक्षपदीं ख्यातनाम समाजसेवक व साहित्यिक श्री. ना. ग. गोरे यांची योजना झाली होती. आपल्या भाषणांत ‘ कोंकणी व मराठी ह्या भाषा खरोखरीच पृथक् आहेत काय ? ’ या प्रश्नाचा त्यांनी अनेक दृष्टींनी विचार केला आणि तथाकथित कोंकणी भाषा ही स्वतंत्र भाषा नसून ती मराठीची एक बोली होय असा आपला निर्णय दिला तो योग्यच आहे. ‘ कोंकणी या एका बोली भाषेला सरकारने एवढें मोठें स्थान दिलेलें पाहून देवगड, विजयदुर्गाकडच्या चित्पावनांनी, वाळवे खोऱ्यांतील मराठ्यांनीं ‘डहाणू उंबरगांव–डांगकडच्या वारल्या-भिल्लांनी, खानदेशकडच्या लेवापाटीदारांनी, नाशिक–मालेगांवच्या वंजाऱ्यांनी आपापल्या बोली–भाषांना मान्यता मिळवण्याचा जर आग्रह धरला तर गरीब बिचाऱ्या मराठीला आपली म्हणतां येईल अशी शेदोनशे चौरस मैलांची तरी जागा उरेल की नाही याची मात्र मला शंका वाटते ! ’ श्री. ना. ग गोरे यांनी व्यक्त केलेली ही शंका रास्त आहे. मराठी भाषा एकरसात्मक बनविण्याच्या दृष्टीने निरनिराळ्या बोली भाषांतील वैशिष्ट्यें मूळ मराठींत सामावून घेण्याचा दूरदर्शीपणा मराठी पंडितांनी दाखविला पाहिजे हें आम्हीं अनेकदा प्रतिपादन केलें आहे. श्री. गोरे यांनीहि तशीच सूचना केली आहे. ते म्हणतातः

“माझ्या येथवरच्या प्रतिपादनाचा अर्थ कृपाकरून आपण असा करूं नये की मी आपणांस कोंकणीचा त्याग करावयास सांगत आहे. तुमची ही किंचित् सानुनासिक व आरोह-अवरोहयुक्त भाषा खानदेशांतल्या किंचित् बोबड्या व मऊ अशा अहिराणी भाषेइतकी माझ्या कानांना गोड लागते. ती आपण जरूर जतन करा. जे शब्द, ज्या नाजूक छटा व जो लवचिकपणा कोकणींत आहे पण मराठींत नाही, त्यांची भर मराठीमध्ये टाकून तुम्ही मराठीचें अभिनव शिल्पकार बना ” “ कोंकणी ही मराठीच्या षोडशकलांपैकीच एक कला आहे असें मानणाऱ्या माझ्यासारख्यांनी ज्या दोन गोष्टींचें स्वतःला विस्मरण होऊं देतां कामा नये त्या गोष्टी अशा की, कोंकणी–अहिराणीसारख्या बोलभाषांना आपला असा कांहीं एक खुशबु असतो, चव असते, सौंदर्य असतें. कऱ्याचें फूल असतें इवलेसें, फुलतें रानांत. पण त्याचा वास वाटसरूचा जीव मुग्ध केल्यावांचून राहात नाही. त्याला रानफूल म्हणून तुच्छ लेखणारा स्वतः अरसिक ठरणार. त्याचप्रमाणे ह्या उपभाषांना असंस्कृत, हेंगाडी, भ्रष्ट भाषा म्हणून तिरस्कृत ठरविण्याचा प्रमाद आपल्या हातून कदापि घडतां कामा नये. उलट त्यांचे गुणविशेष मराठीने स्वतःला जोडून घ्यावे.

श्री. गोरे यांनी कोंकणी व अहिराणीचा उल्लेख केलेला आहे, तो उपलक्षणात्मक आहे हें सांगायला नकोच. या बोलींप्रमाणेच इतर बोलींनाहि तिरस्कृत ठरविण्याचा प्रमाद कुणी करूं नये असा त्यांच्या प्रतिपादनाचा भावार्थ आहे. वेळीं–अवेळीं ‘ वऱ्हाडी ’ बोलीविरुद्ध किंवा तिच्या पुरस्कर्त्यांविरुद्ध नाक मुरडणाऱ्यांनीं इकडे अवश्य लक्ष द्यावें. वऱ्हाडी ही मराठी-


अनुक्रमणिका

हून वेगळी असल्याच्या ' भाषाकारणा ' चें बीज अलीकडे पेरलें जात आहे. तें वाढण्याला फारसा वेळ लागणार नाही हें ' सुज्ञास सांगणें न लगे. '

### परिषदेचे नवीन अध्यक्ष : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

दिल्ली येथील साहित्य संमेलनाचे व महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नवीन वर्षाचे अध्यक्ष म्हणून तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची निवड झालेली आहे. त्याबद्दल आम्हीं त्यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों. श्री. जोशी हें संस्कृतचे गाढे पंडित आहेत. अलीकडे जुन्यानव्या मराठी वाङ्मयाशीं अधिक निकट परिचय ते करुन घेत आहेत. आंग्ल वाङ्मयाचेंहि परिशीलन त्यांनी चांगलें केलें आहे. त्यामुळें कोणत्याहि वाङ्मयविषयक प्रश्नाकडे तुलनात्मक दृष्टिकोनांतून ते पाहूं शकतात. वाङ्मयकारण हें स्वतंत्र कारण असलें तरी धर्मकारण, समाजकारण, राजकारण इत्यादिकांपासून तें पूर्णपणें वेगळें असूं शकत नाही याची जाणीव त्यांना आहे. त्यामुळें वाङ्मयक्षेत्रांतील ' उच्चभ्रं ' च्या एकांगीपणापासून ते अलिप्त आहेत. वाङ्मयाप्रमाणेंच जीवनाच्या इतर क्षेत्रांतहि कर्तेपणाने वावरणारे ते असल्यामुळे त्यांच्या विचारांना समतोलपणा प्राप्त झाला आहे. अनेक प्रादेशिक संमेलनांच्या अध्यक्षपदांवरून त्यांनी केलीं भाषणें याची साक्ष देतील. अशा या श्रेष्ठ विचारवंताचें नेतृत्व संमेलनाला व परिषदेला उत्तम मार्गदर्शक होईल अशी आम्हांला आशा वाटते. आम्हीं त्यांचें पुन्हा अभिनंदन करता व त्यांच्या कारकीर्दीला सुयश चिंतितों.

### दिल्ली येथील मराठी साहित्य संमेलन

ता. १ ऑक्टोबरपासून तो ५ ऑक्टोबरपर्यंत दिल्ली येथें साहित्यसंमेलनाचें ३७ वें अधिवेशन तर्कतीर्थ जोशी यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलें. महाराष्ट्राचे झुंझार साहित्यिक श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ हे संमेलनाचे स्वागताध्यक्ष होते. त्यांचें भाषण सर्वच दृष्टींनी अतिशय सुंदर झालें असें आम्हीं म्हटलें तर ' रसिक ' ' तर्कतीर्थ ' रागावणार नाहीत याची आम्हांला खात्री वाटते. ' नवसमाजनिर्मितींत सर्वात श्रेष्ठ स्थान साहित्याला आहे ' हें सांगतांना आपल्या वाणीचा विलास त्यांनी कसा विस्तारला तें पहाण्यासारखे आहे. ते म्हणतात:—

" या नवसमाज–निर्मितींत सर्वात श्रेष्ठ स्थान साहित्याला आहे संविधानांत कल्पिलेलें स्वातंत्र्य आतां अनुभवांत आणावयाचें आहे. व्यक्तिव्यक्तीनें त्याची मागणी केली पाहिजे. प्रदेशाप्रदेशाने त्यासाठी झटलें पाहिजे. राज्याराज्याने त्याचा मार्ग मोकळा केला पाहिजे. हें सर्व घडून येण्यासाठी साहित्याने पुढे आलें पाहिजे. मनांचा संकल्प क्रियेची बैठक असते. साहित्य हें जीवनाचें पार्श्वसंगीत आहे. जी ज्याची श्रद्धा तसा तो होतो. जसें समाजाचें साहित्य त्याप्रमाणे समाजाचें जीवन अंतर व बाह्य दोन्ही; सह येतें तें साहित्य. जीवनाव्यतिरिक्त त्याला अस्तित्व नाही. जीवनांत निर्माण होऊन जीवनाला बदलणारें हें स्रष्टा व सृजन दोन्ही आहे. शब्द व अर्थ यांत विच्छेद नसतो. त्यांच्यातील साहचर्याचें नित्यत्व जितकें सत्य तितकेंच साहित्य व जीवन यांच्यांतील साहचर्य हें नित्य व सत्य आहे. जीवनांतील सुख–दुःखें, प्रसंग व पेचप्रसंग, अद्भुत व अकल्पित अनुभवाचे यात्रेंत घडलेलें सर्व कांही, सुसंगत व विसंगत हीं सर्व साहित्य निर्माण करीत असतात. साहित्य कृतज्ञतेने मग जीवनाला अनेक परीनें प्रेरणा देऊन त्याची फेड करीत असते. शब्दाला वेदान्त्यांना ब्रह्माची उपमा दिली आहे. केवढी

अनुक्रमणिका

शक्ति शब्दांत आहे.' माझा भारत " माझा महाराष्ट्र 'येवढे शब्द उच्चारतांच अगर ऐकतांच केवढी ' आशयवल्ली ' आपल्या डोळ्यांपुढे उभी राहते. हे शब्द शुद्ध प्राकृत खरे, परंतु ते प्रतिज्ञेने अमृतालाहि जिंकतील हाच निर्णय तुम्ही द्याल. मृदुपणांत कुसुमुरांतील आनंदहि या-पुढे फिका. यांतील छंदाने सुवासालाहि मागे टाकलेलें तुम्ही पाहाल. वास्तविक तुम्ही ऐकत आहांत पण हा आपला रस आहे असें प्रत्येक इंद्रिय तुम्हांला बजावीत आहे. या शब्दांतील आशय जाणून डोळे तृप्त होतील. आणि जेव्हां या दोन्हींसाठी आम्ही जगूं व मरूं असें मी म्हणतांच ' जेथें संपूर्णपद उभारे । तेथ मनाची धांवे बाहिरे । बोलुं भुजाही आविष्कारें । आलिं-गावया ' अशी स्थिति निर्माण होऊन आपलें मनच इंद्रियांना मागे टाकून बाहेर पडेल, आपल्या भुजा या वाक्याला भेटावयाला धांवतील. केवढें सामर्थ्य आहे शब्दांचें आणि जे शब्दांचें अंतःकरण जाणतात व रसिक भृंग्याप्रमाणे त्यांत प्रवेश करतात, आणि त्यांना शब्द म्हणजे चिंतामणिच वाटतील यांत शंका नाही. "

'देशाचें आता आनंदभुवन करावयाचें आहे' हा संकल्प सांगून तो सिद्धीला नेण्यांत साहित्यावरील जबाबदारी कोणती व ती कशी पार पाडायची याचें निवेदन करतांनाहि काका-साहेबांच्या वाणीला अपूर्व स्फूर्ति आली आहे. उतारा किंचित लांब वाटला तरी तो देण्याचा मोह आवरत नाही. ते म्हणतात : " आजच्या राजकारणांत प्रभावी व प्रगतिपर साहित्य हें चैतन्य आहे. साहित्याने हें जाणलें पाहिजे. कोणी साहित्याला राजकारणाचा गुलाम केलें असाहि आरोप करतील. स्वतंत्र राष्ट्रांत राजकारण, समाजकारण व अर्थकारण गोत्र न पटण्याइतकें विभिन्न असत नाही. शरीरांत ज्याप्रमाणे त्रिदोष समप्रमाणांत असले म्हणजे शरीर सुदृढ राहतें, तसेंच हीं तिन्ही " कारणें " समतोलांत असलीं म्हणजे तें राज्य, तो समाज सुस्थित व सुदृढ राहतो. या कामीं प्रत्येकाला असें कांही कर्तव्य आहे. नागरिकाला, साहित्यि-काला, सैनिकाला व पंडिताला पण ! साहित्य हेतुशून्य असतें हें खरें नाही. साहित्य म्हणजे समाजाची वाङ्मयमूर्ति. समाजपुरुषाचा वाणीविलास होय. समाज जगतो तो कांही हेतु धरून. केवळ पशूप्रमाणे माणसें जन्मापासून मृत्यूपर्यंत प्रवास करीत नाहीत. विचार करतात, मनांत कांही आणतात, चढती बढती पदवी पावतात. मन हेंच मुळीं हेतुविरहित, संकल्पविरहित नांदूं शकत नाही. मग मनाचें आडांत असेल तेंच साहित्याचे पोहऱ्यांत येणार. संकल्पांचें वाचिक स्वरूप साहित्य. समाजाचा सोडून साहित्य नसल्याने समाजाला हेतु हाच साहित्याचा हेतु ठरतो. समाजाच्या वैचारिक चलनांतच साहित्याचीं मूल्यें मोजलीं जातात. साहित्य हें शस्त्र व शास्त्र आहे म्हणून तें स्वयमेव प्रचारक असतें. पुष्प आपल्या सुगंधाचा स्वयमेव प्रचार करतें. ब्रह्मदेवाने सृष्टि निर्माण केली यांतच प्रचार झाला. अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तु व्यव-स्थित मांडल्या म्हणजे त्यांत सुव्यवस्थेचा, सुरचनेचा प्रचार आलाच. वस्तूला अंगभूत जसे तिचे गुण त्याचप्रमाणे साहित्याचा अंगभूत गुण न बोलतां प्रचारित होतो. साहित्य यांत सामाजिक भाव आहे. एकाने एकान्तीं कांही म्हटलें अगर गुणगुणलें तर तें निराळें. पण तेंच त्याने एका श्रोत्याला जरी ऐकविलें तरी तें साहित्य होतें व त्यांत कळत न कळत हेतु वावरत असतो. फार काय, एकाने मनाशींच गुणगुणलें तर त्याला समाधान होतें. कांही भाव त्याचे मनांत येतात. मग तो निराळ्या दृष्टीने भंवतालच्या सृष्टीकडे पाहूं लागतो. त्याचे मुखावरील प्रसन्नतेने अभावितपणें प्रचार होऊन निराळें वातावरण उत्पन्न होतें. शब्द शब्द एकत्रित येऊन वाक्यरचना उभारली जाते, तशी एक एक व्यक्ति वाढत गेली की साहित्यभाग स्पष्ट होत जातो. कवि अगर साहित्यिक कितीहि व कसाहि दावा करोत, त्यांचा हृदयस्थ हेतु

आपल्या भावनांचा आविष्कार जगापुढे यावा हाच असतो. केवळ निरपेक्ष असें मन कांही कल्पूंच शकत नाही. निर्गुण-निराकार, शुद्ध-बुद्ध, ब्रह्म हेंहि शब्दानेच वर्णावें लागतें. जेथून शब्द परततात त्यापुढे काय आहे हेंहि सांगण्यासाठी शब्द ! व त्यांतहि हेतु आलाच ! कवि-श्रेष्ठ तुलसीने स्वांत:सुखाय जरी रघुनाथगाथा भाषाप्रबंध रचून मंजुळ केली तरी त्याचें स्वांतः-सुख म्हणजे जनतेचें सुख होतें. पिता, माता, बंधु, पति, पुत्र, स्वामी, सेवक समाजांत केव्हा आदर्श ठरतात हें दाखवून जनाला सन्मार्गाला लावण्यांतच त्याचें स्वांत:सुख होतें. तात्पर्य, जलाबरोबर द्रवता, आकाशाबरोबर अनंतत्व, इतकें साहचर्य साहित्य व समाज यांत असून त्यांतील अन्योन्य संबंध हेतुद्वाराच कार्यान्वित होतात.

वरील मौलिक परिस्थिति लक्षांत घेऊन स्वांत:सुखाय गरिबाच्या जीवनाचा भाषाप्रबंध रचावयाचा आहे. आधी रामायण व मग राम याप्रमाणे घडावयाचें आहे. साहित्यिकांनी हें स्वांत:सुख म्हणजे वैयक्तिक अगर प्रादेशिक सुख नव्हे, हें आजच्या स्थितींत जाणून आपलें साहित्य विशाल भूमिकेवरून विवरावयाचें आहे. दलित व दडपलेल्या, उदासीन व उपेक्षि-लेल्या जनतेचीं दुःखें अपार आहेत. वर्जित व वंचित जनता रावणाप्रमाणे उन्मत्त झालेल्या लक्ष्मीधरांच्या गुलामगिरींत सीतेप्रमाणे झुरत आहे. आपल्या विमोचनाची वाट पाहत आहे. क्रौंचमिथुनांतील एक काममोहित, निषादाने मारलें व पहिलें काव्य आद्य कवीच्या मुखावाटे बाहेर पडलें. आज हजारों नरनारी क्षणक्षणाला मानवनिर्मित विषमतेला कायम ठेवणाऱ्या निषादांकडून मारली जात आहे. वाल्मिकीच्या साहित्यिक वारसांनो, कुठें आहे तुमची प्रतिभा ? जनमनाला उसळून लावणारा तुमचा काव्यप्रबंध कोठे आहे ? भावी समाजाचें चित्र नाट्य-रूपाने उभें करून अथांग प्रयत्नांना प्रेरणा करणारी तुमची सृजनशक्ति कोठे आहे ? या प्रयत्न यज्ञांत सर्व या. जे मागच्यांनी ठेवलें त्यांत भर घाला, जेथवर आणलें त्यापुढे कांही पावलें न्या. विद्यमान दुःस्थिति व भावी सुखस्वप्नें म्हणजे साहित्याच्या कामधेनु आहेत. यांत "तान्ही आणि पारखी ' असें नाहीच. मागील व विद्यमान साहित्यिकांत मी कसा फरक करूं ? ' पहिले सरते। श्लोक न म्हणावे गीते। जुनी नवी पारिजाते। आह्माते काई ॥ " असेंच थोडेसें आहे. समुद्राच्या लाटा एकामागून एक येतांना दिसतात पण त्या एकच. पृथक-त्व हा भास. त्याच न्यायाने महानुभाव चक्रधर स्वामीपासून आज ज्यांचें साहित्य प्रकाशित होणार आहे त्या सर्वांत मौलिक एकताच आहे. काल, आज, व उद्या हे सोईसाठी आपण विभक्त मानतों. पण एका कालरूपी महावस्त्रावरील हे तंतु आहेत. सप्ताहांत विणा खाली ठेवावयाची नसते. त्याचप्रमाणे साहित्याच्या सप्तशतकांत मराठी साहित्याच्या संदेशाची विणा खाली ठेवली गेली नाही. पंडितकवींनी, भक्तकवींनी, शाहिरांनी आपला प्रहर सांभाळला, ज्ञानोबा तुकोबापासून विनोबापर्यंत हा अखंड नामसप्ताह चालू आहे. यांत सर्व ज्ञातीचे नारी-नर समभावाने आले व येत आहेत. आणि जेव्हा जेव्हा मी मराठी साहित्याची सुंदर सुभग मूर्ति डोळ्यांपुढे आणतों त्यावेळीं ' वाणी अनयन, नयन बिनवाणी ' अशी स्थिति होते. डोळे बोलूं शकत नाहीत व वाणीला डोळे नाहीत. ती मूर्ति मनांतच भरून राहिली आहे. आणि जें मी कांही बोललों आहे तें केवळ ज्ञानेश्वरांच्या अनुपम शब्दांत सांगावयाचें म्हणजे " कां अफाटा समीकरणा। आपैतेपण शाहाणा। केले जैसें विंजणा। निर्मूनियां ॥ " गगनव्यापी वायूला अल्पशा पंख्यानें धरण्याचा हा प्रयत्न आहे. तथापि यामुळे तुमचीं मनें किंचित् सुखावलीं गेलीं तर जीवनांतील एक मोठा आनंद मला प्राप्त होणार आहे. "

## तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचें भाषण

संमेलनाचे अध्यक्ष श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचें भाषण सर्वच दृष्टींनी 'मोठें' होतें '"साहित्य ही संस्कृति रचणारी एक महान् शक्ति होय' असें सांगून ती प्राप्त करून घेण्यासाठी 'साहित्यिक, प्राध्यापक व पंडित' यांनी वाङ्मयतप आचरलें पाहिजे असें ते म्हणाले. या आपल्या वाङ्मयतपाचा क्रियाकलाप कोणता व त्यास साफल्य कसें प्राप्त होईल याचें विवरण व या संबंधाचा मूलभूत दृष्टिकोण मला अध्यक्षीय भाषणांत सांगावयाचा आहे. इतिहासाचें तत्त्वज्ञान हें या दृष्टिकोणाचें अधिष्ठान आहे. महाराष्ट्राची सांस्कृतिक पार्श्वभूमि गृहीत धरून संस्कृतीचा इतिहास व वाङ्मयेतिहास यांचा परस्पर संबंध दर्शित करणें हा या दृष्टिकोणाचा गाभा आहे. हा दृष्टिकोण विशद करण्याकरिता तत्संबंधाने उपस्थित होणाऱ्या चार मुद्यांचा अत्यंत संक्षिप्त ऊहापोह मी येथे करणार आहें. ( १ ) संस्कृति व साहित्य यांचा संबंध. ( २ ) महाराष्ट्रांतील भारतीय संस्कृतीचें ऐतिहासिक स्वरूप. ( ३ ) मराठी वाङ्मयाचा इतिहास. ( ४ ) राष्ट्रीय ऐक्यास पोषक असें मराठीचें व प्रादेशिक भाषांचें संवर्धन करण्याचा प्रश्न."

श्री. जोशी यांच्याच शब्दांत त्यांच्या अध्यक्षीय भाषणाची रूपरेषा वर दिलेली आहे. या चार मुद्यांचा 'संक्षिप्त ऊहापोह' त्यांनी ५६ पानांत केलेला आहे. त्या सर्वांचा सारांश या ठिकाणीं देणें जवळजवळ अशक्य आहे. तर्कतीर्थांची संपूर्ण विचारसरणी लक्ष्यांत येण्याच्या दृष्टीने जिज्ञासूंनीं हें भाषण मुळांतूनच पूर्णपणें वाचावें, अशी आम्ही शिफारस करतों.

---

[ पान ३४ वरून ]

आस असली जर साच दिसावा मी
मला माझ्या काव्यांत बघा, तुम्ही."

त्यांच्या काव्यांत त्यांचें जें दर्शन होतें त्यांत त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक विलोभनीय पैलू आपणांला दिसतात. नव्या-जुन्याच्या वादांत प्रा. पंडित पडले नाहीत.

'नवें-जुनें हा वाद वाउगा
नवें जुन्याची घेई जागा
उभयी आहे अखंड धागा
जुनें-नवें हा क्रम चिर अविलग'

असें मत त्यांनी 'नवें-जुनें' या कवितेंत व्यक्त केलें आहे. त्याप्रमाणे कोणत्याहि मतामतांच्या गलबल्यांत न सापडतां प्रामाणिकपणें आपल्या भावनांना शब्दरूप देणें हें एकच कार्य अतिशय रसिकतेने ते करीत असतात. काव्यावर त्यांची असीम निष्ठा आहे. आधुनिक मराठी कवितेचे ते रसिक व व्यासंगी टीकाकार आहेत. जुन्यांना आणि नव्यांना सांधणारा प्रा. पंडित हे दुवा आहेत. आणि म्हणूनच 'सुवास आणि रस' या त्यांच्या काव्यसंग्रहाचें रसिकांनी सहर्ष स्वागत करावयास हवें.

— म. ना. अदवंत

# परिषद्–वार्ता

( चिटणीसांकडून )

कै. वा. म. जोशी स्मृतिदिनः—कै. वा. म. जोशी यांचे स्मृतिदिनानिमित्त सौ. मालतीबाई बेडेकर यांचें ' कादंबरीलेखनांतील कांही शंका ' या विषयावर दि. २० जुलैला सायंकाळीं ६ वाजतां व्याख्यान झालें. कादंबरीच्या मूल्यासंबंधी व कादंबरीकारा-विषयींच्या अपेक्षांसंबंधी सौ. बेडेकर यांनी आपल्या व्याख्यानांत सडेतोड विवेचन केलें.

सत्कार व भेटीः—दक्षिण सातारा जिल्हा साहित्यसभेचे अध्यक्ष श्री. धों. वा. गद्रे ( काव्यविहारी ) हे पुण्याच्या मुक्कामांत असतांना परिषदेने त्यांचा १८ जुलैरोजीं सत्कार केला व त्यांच्या कार्याचा गौरव केला. श्री. पु. शं. पतके ( दिल्ली ) व प्रा. अ. ना. देशपांडे ( नागपूर ) नांनी दि. १० सप्टेंबर व १३ सप्टेंबर रोजीं परिषदेस भेटी दिल्या. दोघांशीहि परिषदेच्या कार्यकर्त्यांनी चर्चा केली. म. म. प्रा. द. वा. पोतदार यांची साहित्य-आकदमी-वर सल्लागार म्हणून नियुक्ति झाल्याबद्दल १६ सप्टेंबर रोजीं त्यांचा परिषदेच्या कार्यकर्त्यांनी सत्कार केला.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा सत्कारः—दिल्ली संमेलनाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा परिषदेतर्फे ६ सप्टेंबरला प्रकट सत्कार करण्यांत आला. सत्कार-प्रसंगीं प्रा. माटे, म. म. प्रा. पोतदार, श्री. त्रि. म. बेडेकर व श्री. व्यंकटेशशास्त्री जोशी यांचीं भाषणें झालीं. सत्कारसभेचे अध्यक्ष श्री. वि. द. घाटे होते.

दिल्ली संमेलनाचा वृत्तांतः—मराठी साहित्य संमेलनाचें ३७ वें अधिवेशन ' मराठी साहित्य मंडळ' या संस्थेच्या वतीनें दिल्ली येथें दि. १ ते ६ आक्टोबर या अवधींत मोठ्या थाटा-माटानें साजरें झालें. संमेलनाला जोडून 'मराठी सांस्कृतिक महोत्सव' हि साजरा करण्यांत आला. संमेलनाचे बहुतेक सर्व कार्यक्रम ' कम्युनिटी सेंटर हॉल ' मध्यें झाले. कार्यक्रम विपुल, विविध, उदबोधक, त्याचप्रमाणें मनोरंजकहि होते. रेल्वे भाड्याची सवलत मिळाल्यामुळें महाराष्ट्राच्या सर्व विभागांतून सुमारें १००० प्रतिनिधि संमेलनाला उपस्थित होते. दि. १ ला सकाळीं ९ वाजतां पाऊस पडत असतांहि पं. जवाहरलाल नेहरू यांच्या भाषणाने संमेलनास उत्साहानें आरंभ झाला. याच वेळीं स्वागताध्यक्ष श्री. न. वि. गाडगीळ व अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची भाषणें झालीं. दरवर्षीप्रमाणे विविध वाङ्मयीन शाखा संमेलनें व वाङ्मयीन चर्चा याहि संमेलनांत झाल्या. संत वाङ्मय ( अध्यक्ष–पु. मं. लाड, वक्ते–श्री. म. माटे), स्त्री–वाङ्मय ( अध्यक्ष–सौ. कमलाबाई बंब्रावाले, वक्त्या–कमलाबाई देशपांडे ), नाट्य–वाङ्मय ( अध्यक्ष न. वि. गाडगीळ, वक्ते–प्र. के. अत्रे), आधुनिक काव्य ( अध्यक्ष–बा. सी. मर्ढेकर, वक्ते वि. भि. कोलते), भाषाभाषांचे परस्पर संबंध ( अध्यक्ष–त्र्यं. र. देवगिरीकर, वक्ते–प्रभाकर माचवे ), कादंबरी आणि कथावाङ्मय ( अध्यक्ष–आ. रा. देशपांडे, वक्ते–ग. त्र्यं. माडखोल-कर ) अशी सहा उपसंमेलनें झालीं. या संमेलनाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे संमेलनांतील चर्चेत श्री. पुरुषोत्तमदास टंडन, प्रा. द. रा. बेंद्रे, श्री. दिनकर, श्री. तारकेश्वरी सिन्हा, सौ. हुमायु कबीर, श्री. किशनलाल श्रीधरानी, श्री. जैनेंद्रकुमार इत्यादि परप्रांतीय साहित्यिकांनीं भाग घेतला व आपापल्या साहित्याची मराठी–भाषकांना ओळख करून दिली. करमणुकीच्या दृष्टीनें नाट्यप्रयोग, ( मानापमान, भावबंधन, झुंजारराव ), मास्टर कृष्णराव फुलंब्रीकर यांचे गायन, उपस्थित नामवंत कवींचें काव्यगायन, शाहीर नानिवडेकर यांच्या पोवाडे–लावण्या हे





कार्यक्रम उल्लेखनीय होते. दिल्लीला आलेल्या निवडक साहित्य–सेवकांना राष्ट्रपति डॉ. राजेंद्र-प्रसाद यांनीं चहापार्टी दिली. संमेलनांत संयुक्त महाराष्ट्र, दिल्ली येथें संस्कृति केंद्राची स्थापना व साहित्य अकादमीचें अभिनंदन हे तीन महत्त्वाचे ठराव एकमुखानें संमत झाले. संमेलन महोत्सवानिमित्त जुन्या–नव्या मराठी ग्रंथांचें एक प्रदर्शन व्हीनस बुक स्टॉल, पुणें यांच्या व्यवस्थेखालीं भरविण्यांत आलें होतें. हें संमेलन अनेक दृष्टींनी यशस्वी व प्रेरक झालें यांत शंका नाही. संमेलनाच्या यशाला श्री. न. वि. ऊर्फ काकासाहेब गाडगीळ यांचे परिश्रम कारणीभूत झाले व याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें अल्प आहे.

---

## नवीन सभासद

### तहहयात

१. प्रा. गंगाधर गाडगीळ, मुंबई.
२. प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे, नागपूर.
३. श्री. आ. रा. देशपांडे, न्यू दिल्ली.

### साधारण

१. श्री. मु. गो. पाठक, रावळगांव (नाशिक).
२. श्री. तु. शं. कुलकर्णी, हैद्राबाद (द.)
३. श्री. रा. गो. शेळकंदे, ठाणें.
४. श्री. स. वि. जोशी, वकील जुन्नर (पुणें)
५. प्रा. आर. टी. अकोळे, सोलापूर.
६. कु. सिंधू खाडिलकर, सोलापूर.
७. श्री. यू. म. टेंगर, सोलापूर.
८. कु. इंदू देव, सोलापूर.
९. प्रा. यू. म. पठाण, सोलापूर.
१०. श्री. ह. वि. जोशी, पुणें ४.
११. श्री. म. शि. ओझर्डे, पुणें २.
१२. श्री. श्री. गो. देशपांडे, न्यू दिल्ली.
१३. श्री. म. ना. सहस्रबुद्धे, बारामती (पुणें).
१४. श्री. पु. धों. कोतकुंडे, सोलापूर.
१५. श्री. मा. बा. कुलकर्णी, सोलापूर.
१६. श्री. के. वा. जायदे, पुणें २.
१७. श्री. दि. पं. पांडे, वकील, जुन्नर (पुणें)
१८. प्रा. गो. मो. रानडे, जबलपूर.
१९. श्री वि. भि. वाणी, चाळिसगांव. (पू. खा.)
२०. श्री. वा. गं. कुलकर्णी, चाळिसगांव (पू. खा.)
२१. प्रा. गोवर्धनदास पारीख, मुंबई १९.
२२. श्री. गो. अ. जोगळेकर, वकील, जुन्नर (पुणें)
२३. श्री. पं. श्रीरामशास्त्री शेलगांवकर, जालना (हैद्राबादराज्य)
२४. श्री. पां. व्ही. चव्हाण, देवरूख (रत्नागिरी)
२५. श्री. गो. ब. कुलकर्णी, पुणें २.
२६. श्री. वि. गो. गंधे, अहमदनगर.
२७. श्री. ज. ए. कुलकर्णी, सोलापूर.
२८. श्री. सुमन वामन दावके, पुणें २.
२९. श्री. देवेंद्रकुमार ग. आर्य, सोलापूर.
३०. श्री. न. श. कुलकर्णी, पुणें २.
३१. श्री. य. ना. आठवले, मुंबई २३.
३२. श्री. भा. के. लिमये, मुंबई ७.
३३. प्रा. ल. के. आरावकर, मुंबई १६.
३४. प्रा. वि. ग. हराळकर मुंबई ७.
३५. प्रा. म. वि. घासकडवी, अहमदनगर.
३६. श्री. अ. वा. अंतरकर, पुणें २.
३७. श्री. दि. ग. जोशी, पुणें २
३८. श्री. बा. अ. ठाकूर (ब्रि. ई. आफ्रिका).

---

## मराठी साहित्य संमेलन. ३७ वें अधिवेशन, न्यू दिल्ली

# संमत झालेले ठराव

ठराव १ः—अहमदाबाद येथील ३६ व्या साहित्य संमेलनानंतर पुढील व्यक्ति निधन पावल्या. त्यांच्या निधनानिमित्त हें संमेलन दुःख व्यक्त करीत आहे.

१. प्रा. र. धों. कर्वे.
२. यशवंतराव सरदेसाई.
३. वि. द. साठे.
४. त्रि. म. भुस्कुटे.
५. झूल्. ब्लॉक.
६. राजरत्न माणिकराव.
७. रमणलाल देसाई.

— अध्यक्षांकडून.

कै. झुल्. ब्लोक यांच्यासंबंधी प्रा. वा. दा. गोखले यांनी माहिती सांगितली.

ठराव २ः—भाषावार प्रांतरचनेसंबंधीं, विशेषतः संयुक्त महाराष्ट्रासंबंधीं मराठी साहित्य संमेलनाने आजपर्यंत घेतलेली भूमिका या संमेलनाला सर्वथैव मान्य असून सर्वपक्षीय संयुक्त महाराष्ट्र परिषदेनें यासंबंधीं राज्यपुनर्वटना समितीपुढें सादर केलेल्या निवेदनाला या संमेलनाचा पूर्ण पाठिंबा आहे. राज्यपुनर्रचनेच्या प्रश्नासाठीं मध्यवर्ति सरकारनें समिती नेमली याबद्दल या संमेलनाला समाधान होत आहे.

— अध्यक्षांकडून.

ठराव ३ः—भारतांतील निरनिराळ्या प्रांतिक भाषांच्या उन्नतीकरितां भारत सरकारने साहित्य अकादमी व संगीत नाट्य अकादमी यांची स्थापना केल्याबद्दल हें संमेलन भारत सरकारचें हार्दिक अभिनंदन करीत आहे. लवकरच या अकादमींची रचना पूर्ण होऊन त्याचे प्रातिनिधिक संस्थांच्या सल्ल्यानुसार काम सुरू होईल व त्या अकादमीकडून सर्व भाषांच्या उन्नतीस हातभार लावला जाईल अशी आशा हें संमेलन व्यक्त करीत आहे.

सूचक : वि. भि. कोलते  अनुमोदन : श्री य. दि. पेंढरकर

ठराव ४ः—स्वतंत्र भारताची एकरूपता व सामर्थ्यसंपन्नता ही अधिकाधिक दृढ व्हावी या दृष्टीनें भारताच्या निरनिराळ्या प्रमुख प्रांतीय भाषा आहेत. त्यांच्यांत परस्पर स्नेह, सलोखा, संपर्क आणि सहकार्य यांची दिवसेंदिवस वृद्धि होणें आवश्यक आहे.

दिल्ली आज स्वतंत्र भारताची राजधानी आहे. त्यामुळें भारतांतील निरनिराळ्या क्षेत्रांतील प्रमुख व प्रातिनिधिक स्वरूपाचे कार्यकर्ते यांची येथें कारणपरत्वें नेहमीं ये-जा होत असते. याशिवाय त्यांच्यापैकी कांहींचे येथे दीर्घकाळ वास्तव्यहि घडत असतें. ही गोष्ट लक्षांत घेतां भारतांतील या प्रमुख अशा प्रांतीय भाषांशीं उपरोक्त हेतूच्या सिद्धीसाठीं विचारविनिमय दळणवळण व संघटन वाढविण्याच्या दृष्टीनें दिल्ली हेंच अत्यंत सोयीस्कर असें ठिकाण आहे.

अनुक्रमणिका







यासाठीं महाराष्ट्र संस्कृतीचें एक भरभक्कम केंद्र येथें स्थापण्यांत यावें असें या संमेलनाचें मत आहे.

या कार्यासाठीं हें संमेलन पुढील सद्गृहस्थांची एक समिती नियुक्त करीत आहे. या समितीने आपल्या कार्यप्रगतीचें प्रतिवृत्त पुढील संमेलनास सादर करावें.

— स मि ति : —

१. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ( अध्यक्ष, म. सा. संमेलन. )
२. म. म. प्रा. द. वा. पोतदार
३. श्री. भाऊसाहेब हिरे.
४. श्री चिंतामणी देशमुख
५. श्री. न. वि. गाडगीळ. (संयोजक.)

या समितीस अधिक सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार आहे.

सूचक– न. वि. गाडगीळ.

अनुमोदक– द. वा. पोतदार. वॅ. ओक. वा. वा. दीक्षित.
गो. ब. माकोडे. वि. वि. अडोणी. वि. का. उपशाम.
गोडबोले वकील, सांगली. मा. व. गोडबोले. विश्वनाथ वाबळे.

ठराव ५:–अखिल भारतांत नभोवाणी केन्द्राचें जाळें पसरविण्याचा भारत सरकारचा मानस आहे. अशा परिस्थितींत औरंगाबाद येथे असलेल्या तयार अिमारतीचा व यंत्रसामुग्रीचा उपयोग करून औरंगाबाद नभोवाणी केन्द्र पूर्ववत् सुरू करून मराठवाड्यांतील जनतेच्या अपेक्षांची भारत सरकारने पूर्तता करावी अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

सूचक– ह. ग. वैष्णव. अनुमोदक– स. रा. गाडगीळ.

ठराव ६:–भारतांतील अन्य भाषा असलेल्या अभिजात साहित्याचा मराठी जनतेस परिचय व्हावा या दृष्टीने साहित्यिकांना हें संमेलन आग्रहाची विनंती करीत आहे कीं, त्यांनी अशा बहुमोल साहित्याचा अनुवाद करून तो अनुवाद साहित्य परिषदेच्या कार्यालयाकडे पाठवावा व कार्यालयाने अशीं अनुवादित पुस्तकें प्रसिद्ध करण्यासाठीं भारत सरकार, राज्य सरकारें व जनता यांजकडून आर्थिक मदत घेऊन या कार्याकडे विशेष लक्ष द्यावें अशी या संमेलनाची शिफारस आहे.

सूचक– पु. शं. पतके. अनुमोदक– मा. व. गोडबोले.

ठराव ७:–मराठींतील उत्कृष्ट नाटकें भारतीय अन्य भाषांत विशेषतः हिंदी भाषेंत भाषांतरित करून ती प्रसिद्ध करण्याची व्यवस्था भारत सरकार, राज्य सरकारें, संगीत–नाटक–अकादमी, साहित्य अकादमी व जनता यांच्या साहाय्याने महाराष्ट्र-साहित्य-परिषदेनें करावी अशी या संमेलनाची शिफारस आहे.

सूचक– पु. शं पतके. अनुमोदक– सी. पा. गोगटे.








ठराव ८:– मुंबअी राज्याच्या तीनहि प्रांतांत प्रादेशिक चित्र–विद्यालयें काढावीं, असा सल्ला सरकारनें नेमलेल्या सल्लागार समितीनें मुंबअी सरकारला दिला आहे. त्यानुसार महाराष्ट्र विभागापुरतें प्रादेशिक चित्र–विद्यालय काढण्यास मुंबअी सरकारने विलंब लावूं नये अशी या संमेलनाची तातडीची मागणी आहे आणि तसें करतांना अिन्स्टिट्यूशन ऑफ मॉडर्न आर्ट, पुणें अित्यादि संस्थांची कामगिरी सरकारने लक्षांत घ्यावी अशी या संमेलनाची सरकारास विनंती आहे.

— अध्यक्षांकडून

ठराव ९:–मराठींतील अेक नामवंत साहित्यिक आचार्य प्र. के. अत्रे यांच्या "श्यामची आई" या साने गुरुजींच्या कादंबरीवर आधारलेल्या चित्रपटास राष्ट्रपतींचें सुवर्णपदक देण्याबद्दल निवड समितीने शिफारस केल्याची वार्ता ऐकून या संमेलनास अतिशय आनंद होत आहे. हा केवळ आचार्य अत्रे या व्यक्तीचाच गौरव नसून मराठी साहित्य व चित्रसृष्टी यांचाहि गौरव आहे असें या संमेलनास वाटतें. या महान यशाबद्दल हें संमेलन आचार्य अत्रे आणि "श्यामची आई" चित्रपटांतील त्यांचे कलावंत या सर्वांचें अभिनंदन करीत आहे.

— अध्यक्षांकडून

ठराव १०:–ऑल अिंडिया रेडिओच्या परराष्ट्रीय ध्वनिक्षेपणाच्या कार्यक्रमांत मराठी कार्यक्रमांना स्थान असावें अशी मागणी हें संमेलन सरकारकडे करीत आहे.

— अध्यक्षांकडून

---

## हिंदी सार्थ ज्ञानेश्वरी

संत ज्ञानेश्वर महाराजांची कीर्तिपताका महाराष्ट्रांतच नव्हे, तर जगांत फडकत आहे. त्यांनीं मराठींत श्रीमद्भगवद्गीतेवर भावार्थदीपिका अर्थात् ज्ञानेश्वरी नांवाची टीका प्रकाशित करून जनतेसाठीं साहित्य व शांतीचे अपूर्व भांडार उघडून ठेवलें आहे. या भांडारांतील अनमोल रत्नांचा परामर्ष भारतीय भाषाभाषी यांनीं तर घेतलाच, विदेशी–भाषाभाषी यांनींहि त्यांची मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. अशा या अद्वितीय ज्ञानेश्वरी ग्रंथांच्या ह. भ. प. प्राचार्य शं. वा. दांडेकर, एम्. ए. यांनीं संपादित केलेल्या संशोधनपूर्ण सांप्रदायिक सार्थ टीकेच्या हिंदी भाषांतराचे कार्य चालूं आहे.

हिंदी भाषेंत आजपर्यंत ज्ञानेश्वरीच्या तीन टीका प्रसिद्ध झाल्या आहेत. या तिन्ही ग्रंथांत ज्ञानेश्वरीचें फक्त गद्यरूप धांवतें भाषांतर आहे. अजूनपर्यंत ज्ञानेश्वरीचे ओंवीसहित प्रामाणिक सार्थ भाषांतर उपलब्ध झालेलें नाहीं. हल्लीं ह. भ. प. प्राचार्य शं. वा. दांडेकर एम्. ए. यांच्या नेतृत्वाखालीं चालूं असलेल्या हिंदी सार्थ ज्ञानेश्वरीमुळें हिंदी साहित्यांतील उणीव भरून निघण्यासारखी आहे.

हिंदी सार्थ ज्ञानेश्वरीमध्यें आजपर्यंत प्रकाशित झालेली संत ज्ञानेश्वर वाङ्मयाची सूची द्यावयाची आहे. वाचकांनीं सदर माहिती 'ज्ञानेश्वरी अनुवाद कार्यालय, ७१५ अ, सदाशिव पेठ, पुणें २' या पत्त्यावर अवश्य पाठविण्याची कृपा करावी.

प्रका. आंतर भारती प्रकाशन, नारायण, पुणें २ मूल्य १॥ रु.

२६ उर्दू कवितेची तोंडओळख— श्रीपाद जोशी, प्रका. आंतर भारती प्रकाशन, नारायण, पुणें २, मूल्य १। रु.

२७ चिपळूणकर काल आणि कर्तृत्व— ग. त्र्यं. माडखोलकर, प्रका. द. ना. ठाकूर, ठाकूर आणि कं लि. अमरावती, मूल्य ४ रु.

२८ ही राधा कोण?—ले. प्रका. मा. ह. साळवेकर ३४ डोंगरबाग, भवानी शंकर रोड, दादर-मुंबई २८, मूल्य ९ आणे.

२९ अस्पृश्यता आणि धर्मः—ले. प्र. मा. ह. साळवेकर, मूल्य ६ आणे.

३० माझे वक्षिसाचें निबंधः—ग. दा. खरे, गदग, मूल्य १२ आणे.

३१ तलावांतील चांदणें:-गंगाधर गाडगीळ, प्रका. लाखाणी बुकडेपो. मुंबई ४ मूल्य ३ रु.

३२ संभाषणाची कलाः—शांताराम शिंदे, प्रका. मु. शं. किर्लोस्कर, किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी (द. सातारा) मूल्य १। रु.

३३ काव्यतुषारः—(कविता) सौ. राधाबाई आपटे. व पां. श्री. आपटे, प्रका. डॉ. वा. पां. आपटे, पुणें ४ मूल्य १० आणे.

३४ वाग्दत्ता (नाटक) श्रीपाद सप्रे, प्रका. सेक्रे. दि अहमदाबाद महाराष्ट्र को. के. सोसा. लि भद्र अहमदाबाद, मूल्य १। रु.

३५ श्रीशरभेन्द्र वैद्य रत्नावळी— संपा. आ. कृष्णस्वामी महाडिकराव साहेब प्रकाः—चिटणीस, सरस्वतीमहाल ग्रंथालय, तंजावर, मूल्य १० रु.

३६ गजशास्त्रसार, पक्षीलक्षण आणि चिकित्सा, व चित्ता वहागास चिकित्सा— संपा-आ. कृष्णस्वामी महाडिकराव साहेब, प्रका—चिटणीस सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर, मूल्य ३ रु.

के. भि. ढवळे, समर्थसदन, गिरगांव-मुंबई. प्रकाशनें—

१ दख्खनचा वाघ (नाटक)—भा. श्री. परांजपे, मूल्य १ रु.

२ नवा प्रकाश (कादंबरी)—सुधीर देशपांडे, मूल्य ३ रु.

३ घरटं (कथा) दि. ल. देवधर, मूल्य १॥ रु.

४ रंगावली भाग १ व २ सौ. सुनीति ग. कावाडी मूल्य १ रु. प्र.

५ जकात्यांच्या भाऊचें लग्न—शि. गो. भावे, मूल्य २ रु.

बालवाङ्मय—हिंद प्रकाशन, अकोला (म. प्र.) प्रकाशनें—मूल्य ८ आणे प्रत्येकी.

१ इसापच्या किशोरकथा भाग १ ते ४
२ पंचतंत्रांतील गोड कथा भाग १ व २
३ मुलांचे महाभारत
४ शकुंतला
५ गालिव्हरची मनोरंजक कहाणी भाग १ व २
६ पऱ्यांच्या बालकथा भाग १ व २
७ दर्यावर्दी सिंदबाद
८ अलिबाबा आणि चाळिस चोर
९ रॉबिनहूड
१० रॉबिन्सन क्रूसो
११ सिन्ड्रेला हिमराणी आणि सात ठेंगु.
१२ अक्बर-बीरबल
१३ वडबड्या न्हावी आणि मंतरलेला घोडा.
१४ झोपलेला जागा झाला आणि माले धरणारा कोळी.
१५ अल्लाउद्दीन आणि जादूचा दिवा.

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८।१७, सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—वा. दा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.